श्रीशंकरप्रसन्न.

स्त्रीपुरुषांकरितां

लोकप्रिय संगीत

# नवरस गायन संग्रह.

भाग २ दुसरा

हें पुस्तक

तुकाराम गणपतशेट धामणस्कर

यांनी तयार करून

जगदीश्वर छापखान्यांत छापून प्र. के.

आवृत्ति २ री–प्रती २०००

शके १८२० सन १८९८

ह्या पुस्तका संबंधीं सर्व प्रकारचे हक्क तुकाराम गणपत शेट धामणस्कर यांनीं आपल्या स्वाधीन ठेविले आहेत.

किंमत १ रुपाया.

# जाहिरखबर.

मुंबईंतील व बाहेर गांवांतील लोकांस कळविण्यांत येतें कीं आह्मीं सर्व तऱ्हेचीं पुस्तकें रविवर्माप्रेसचीं अत्युत्तम रंगी बेरंगी चित्रें व स्टेशनरी सामान वगैरे रास्त कमिशननें व्यापारी व गिऱ्हाईकांस नेमलेल्या वेळांत व्ह्याल्युपेबलनें पाठवून देऊं. एकवेळ मागवून पहा.

टी. जी. धामणस्कर.
बुकसेलर्स-पब्लिशर्स.
आणि
कमिशन एजंटस्.
माधवबाग-मुंबई.

233540

## प्रस्तावना.

हें पुस्तक लिहिण्याचा हेतु इतकाच आहे कीं, आजपर्यंत अनेक प्रकारचीं संगीत पुस्तकें झालीं; परंतु त्या सर्वांचा संग्रह करण्यास गायन प्रिय लोकांस फारच कठीण पडत असल्यामुळें संगीतेच्छु व गवय्यी लोकांची ती उणीव दूर करण्याकरितां कित्येक मित्रमंडळीच्या आग्रहास्तव आम्हीं हें पुस्तक छापविलें आहे. ह्या पुस्तकाच्या पहिल्या भागाची लोकांना फारच रुचि लागली व कांहीं लोकांनीं दुसऱ्या भागाची मागणी केल्यावरून हा दुसरा भाग प्रसिद्ध केला आहे. ह्या पुस्तकांत पद्यें, ठुंबऱ्या, गझल, ख्याल, धृपदें, तराणे, टप्पे, दोहोरे, दिंड्या, अंजनीगीत, होरी, वेणी, साक्या, सुबोधपर लावण्या, तशींच चत्राबकावली, गुलबकावली, हामामा ह्यांतील व त्याच चालीवर नवीन करून व जगप्रसिद्ध संगीत पुस्तकांतील जुन्या सुरस पद्यांचा समावेश केला आहे. तरी आमचे देशबांधव व भगिनी आपला उदार आश्रय देतील अशी आशा आहे. ह्या पुस्तकापासून आमचा कमाई करण्याचा मुळींच हेतु नसून फक्त गिऱ्हाइकांच्या सोईकरितां हें पुस्तक छापून प्रसिद्ध केलें आहे. ह्या पुस्तकांत रा. रा. पाटणकर, किर्लोस्कर, त्रिलोकेकर, जोशी, नाटेकर, डोंगरे, देवल, वगैरे अनेक कवींच्या पुस्तकांतील कांहीं पद्यें घेतलीं आहेत.

प्रकाशक.

# आर्यमहौषधि संग्रह.

## ( आर्यौषधींचा कारखाना. )

आर्य ( देशी ) औषधींचा प्रसार व्हावा ह्मणून आमचे पुष्कळ वर्षांपासून प्रयत्न सुरू आहेत. आजपर्यंत आह्मीं शेंकडों औषधींच्या गुणांचा शोध लावून वनौषधीगुणादर्श आदिकरून पुष्कळ पुस्तकें तयार करून औषधींच्या गुणांची प्रसिद्धि केली आहे. तसेंच अनेक औषधें तयार करून पुष्कळ औषधांचा अनुभव घेऊन हटकून रोग दूर करणारीं अशीं औषधें तयार केलीं आहेत. तसेंच आमचेकडे शास्त्रोक्त आणि खात्रीपूर्वक तयार केलेलीं भस्में, मात्रा, गुटिका, चूर्णें, तेलें, पाक वगैरे हीं मिळतात. आमचीं औषधें फारच खातरीचीं असून आमच्या औषधानें रोगी हटकून बरा होतो असाच आजपर्यंत आमचा अनुभव आहे.

आमच्या औषधांपैकीं फारच खातरीचीं औषधें.

| | | |
|---|---|---|
| धुपणीच्या गोळ्या. ७ दिवसांची किंमत. | | १॥ रु. |
| सर्वप्रकारच्या ज्वरावर गोळ्या. पावतोळ्यास | | १ रु. |
| परम्यावरचें औषध. ७ दिवसांची किं० | | १॥ रु. |
| पटकीवर गोळ्या. १ तोळ्यास | | ॥ |
| पोट शूळावर गोळ्या. पाव तोळ्यास. | | १ रु. |
| खोकल्यावर गोळ्या. १ तोळ्यास | | -।- |
| गर्मीवर. ७ दिवसांची किं० | | १॥ रु. |
| केश वाढून काळे होण्याचें तेल. ५ तोळ्यास | | -॥- |
| आयुष्यवर्धक नित्यौषधि. ४ तोळ्यास | | -।- |
| औषधि सरबत. २० तोळ्यांस | | -।= |
| लाक्षातैल सर्व ज्वरांवर. ५ तोळ्यास | | -॥- |
| वीर्य वर्धक स्तंभक गोळ्या. ७ दिवसास | | १ रु. |

ठिकाणाः—डोंगरी जुने तुरुंगाचे कोपऱ्यावर, गौ[illegible]चे समोर, मोरोबा विठोबा कोळी यांचे घरांत मुंबई.

मुरलीधर एकनाथ केमकर वैद्य.

# स्त्रीपुरुषांकरितां

# लोकप्रिय संगीत नवरस गायन संग्रह

## भाग २ दुसरा.

गायन ह्मणजे गायन सरस्वती, नग ह्मणजे कैलास पर्वताप्रत नेण्यास समर्थ आहे, तसेंच गंगा किंवा सरस्वती ही कैलासाप्रत नेण्यास समर्थ नाहीं. तात्पर्य गायन हें अतिश्रेयस्कर होय.

गायन वादनापासून अंतःकरणास अत्यंत आनंद वाटतो. गायनकलेस संस्कृतांत संगीत असें ह्मणतात. व त्यांत गायन, वादन आणि नर्तन, यांचा अंतर्भाव होतो. गायनकलेंत ठेका स्वर, किंवा सुर, व ताल, हीं प्रधान होत. स्वर ह्मणजे वायुपासून उत्पन्न होणारा नाद, किंवा ध्वनि, हा ध्वनि वायूच्या घर्षणापासून दोन प्रकारानें उत्पन्न होतो. जसें—सारंगी, पखवाज, विणा, जलतरंग, तबला, चौघडा, सतार, पेटी, इत्यादि.

एकाच पदार्थांतील संचित वायू थोडा थोडा सोडीत गेल्यामुळें उत्पन्न होणारा ध्वनि. जसें—अलगुजें, सनई, पुंगी, व इंग्लिश हरमोनियम, मनुष्याच्या कंठांतून निघणारा ध्वनि इत्यादि. प्रत्येक सप्तकांत सात स्वर आहेत. त्यांस संज्ञा दिल्या आहेत त्याः— १ षड्ज, २ रिखब, ३ गांधार, ४ मध्यम, ५ पंचम, ६ धैवत, व ७ निषाद.

या सात स्वरांचे ही तीव्र व कोमल असें वर्गीकरण करून बारा स्वर मानिले आहेत. ते असे—सप्तस्वरांपैकीं षड्ज आणि पंचम, यांत तीव्र व कोमल हा भेद नाहीं. बाकी राहिलेले पांच स्वर हे मात्र तीव्र व कोमल या भेदानें दहा मानितात, व अचल ह्मणजे तीव्र, कोमल, भेद नसलेले स्वर २ षड्ज व

पंचम मिळून बारा. गायनांत मुख्य स्वर षड्ज आहे. आतां आवाज चढवीत किंवा उतरीत जावा लागतो, तरी त्या आवाजाचें प्रमाण लिहितां येत नाहीं. ज्याचा आवाज जसा उंच किंवा नीच असेल, त्यामानानें झेंपेल अशा रीतीनें षड्जापासून आवाज चढवीत अथवा उतरीत गेलें पाहिजे.

आरोह ह्मणजे षड्जा पासून आरंभ करून आवाज चढवीत जाणें. अवरोह ह्मणजे निषादापासून आरंभ करून षड्जापर्यंत आवाज उतरीत जाणें. स्वरांच्या नांवांतील आद्याक्षरा वरून गाणें शिकवितांना प्रथम सा, री, ग, म, प, ध, नी, सा, अशीं अक्षरें गावयास सांगतात. हींच अक्षरें सप्तसुरांची दर्शकें आहेत. या सुरांचे आरोहावरोह खालीं दाखविल्या आहेत.

आरोहावरोहाचे प्रकार.

प्रकार १.

! आवाज चढविणें !
! सारीग मपधनीसा !

!आवाज उतरीत जाणें !
!सानीध पम गरीसा!

| प्रकार २. | | प्रकार ३. | |
|---|---|---|---|
| आरोह. | आवरोह. | आरोह. | आवरोह. |
| साग | साध | सारीग | सानीध |
| रीम | नीप | रीगम | नीधप |
| गप | धम | गमप | धमप |
| मध | पग | मपध | पमग |
| पनी | मरी | पधनी | मगरी |
| धसा | गसा | धनीसा | गरीसा |

| प्रकरण ४. | | प्रकरण ५. | |
|---|---|---|---|
| आरोह. | आवरोह. | आरोह. | आवरोह. |
| सारीगम | सानीधप | सारीसारीग | सानीसानीध |
| रीगमप | नीधपम | रीगरीगम | नीधनीधप |
| गमपध | धपमग | गमगमप | धपधपम |
| मपधनी | पमगरी | मपमपध | पमपमगा |
| पधनीसा | मगरीसा | पधपधनी | मगमगरी |
| | | धनीधनीसा | गरीगरीसा |

ताल–ह्मणजे कालाची गति किंवा वेळ मोजण्याकरितां ठोका मारणें ती वेळ मोजण्याची रीति अशी आहे, प्रथम साधारण मनुष्याची नाडी उडत असते त्या उडण्या बरोबर हातानें टाळी वाजवित जावी, किंवा टाळ घेऊन त्यानें ठोका टाकित जावा. यास एक मात्रा ह्मणावी, असा साधारण निमय आहे.

काल–ह्मणजे दोन ठोक्यांमधील वेळ. हा वेळ मोजण्याकरितां मात्रांची योजना संगीतांत केली आहे.

मात्रा–ह्मणजे सुमारें एक सेकंडाचा अवधि, प्रत्येक सेकंडास ठोका मारीत गेलें, ह्मणजे एक एक मात्रेचा सारखा ताल जमला तथापि २॥ पेक्षां जलद किंवा सावकाश मात्रा मोजणें हे गाणाराच्या खुषीवर आहे. कारण गायन चार्तुयावर अवलंबून असतें. साधारणतः प्रचारांतील कांहीं तालांचीं नांवें, मात्रा व त्या त्या तालाचे ठेके खालीं दिले आहेत.

तालांचीं नांवें–तालांच्या मात्रा. तालाचे ठेके.

१ चौताल. बारामात्रेचा. धा धा धिन्ता, किटधा धिन्तां तिटिकत गदिगन.

२ आड्या चौताल. चौदामात्रेचा. धीं, धीं, धागिन्नकतुनाकत्ता धीं धींना धीं धींना.

३ धमार. चौदामात्रेचा. कधेऽत् धेऽघ्धाऽकतिट तिटताऽ.

४ झंपा. दहामात्रेचा. धाऽद्धागीकीट किटधाकीट.

५ सुरफा. का. दहामात्रेचा. धाधा धिनता किटधा, तितिकत गदिगन.

६ आदिताल. सोळा किंवा आठमात्रेचा. नाधिन् धिन्ना, नाधिन् धिन्ना, नातिन् तिन्ना, नाधिन् धिन्ना.

७ तेवडा. सातमात्रेचा. धाकिट, धागी धिट.

८ मत्तताल. नऊमात्रेचा. धातत्त, धागिन् धात्रक, धागींना, तुना कत्ता धी धी ना धी धी ना.

९ ख्याल. आठ मात्रांचा. धात्रकधिन् धिनाधा, तिन् तिन्. तात्रक धिन् धिंनाधा धिन् धिन्.
१० टप्पा. आठ मात्रेचा. धिन्त धिन् धिन् धिंन्त धिन् धिन्, तीन् तीन् तत् धिन्त धिन् धिन्
११ केरवा, आठ मात्रेचा. धिन् धगिन् तिनक.
१२ गज्जल. सात मात्रेचा. तिन् तकधिन् धा धा.
१३ एक्का बारा मात्रेचा धी धी धागित्रक तुनाकत्ता, धागित्रक धीना.
१४ धुमाळी. आठ मात्रेचा. धिन् धिन् धागतिन् तकधिन् धाधा
१५ दीपचंदी. सात मात्रेचा. धा धिन् धागितिन्, ता तिन् धागितिन्.
१६ दादरा. तीन मात्रेचा. धिन् धिन् ना धातीना.
१७ सवारी. पंधरा मात्रेचा. धींत्रक धीना, ततीऽना, तद्धि ना धिना तीऽन तिना तिर किड तुना. किडनग क त्ता, धी धीना, धीधींना.
१८ पंजाबी. आठ मात्रेचा. धा,धीऽन धा, धागिन् तिनता, ताधीनता, धागिनति गिनधा.

याप्रमाणें साधारण रागांची माहिती दीली आहे.

धृपद.

धावून ये मधुसूदना ॥ मज दीनावरी करी करुणा ॥ धुडधुड धावून ये ॥ म० ॥ तूं कैवारी दीन जनांचा ॥ संकटीं हरी पतितोद्धरणा ॥ धावून० ॥ तनोम तनोम तान द्रितान तान तन ननन ॥ धावून० ॥ १ ॥

पद. ( चाल पंचतुंड नररुंड मालधर० )

दत्तदिगंबर भव भयहारक त्यासी माझें नमन असे ॥ दुष्टांतें गुरु दंड करीतो शांति दया ही जया वसे ॥ धृ० ॥ हस्ति कमंडलू दंड कडासन घेउनि अवदुंबर छाईं वसे ॥ स्वभक्ताचें पालन करुनी करितो हेतु पूर्ण कसे ॥ दत्त० ॥ रतन कलियु

गीं समक्ष पाहे गुरु दत्तात्रय हाचि वसे ॥ नाम सारखें दत्त देउनी भक्त आपुले रक्षितसे ॥ दत्त० ॥ प्रथम ध्यान मी आधीं करितों यत्नचि माझा पहिला असे ॥ मतिमंदाला बुद्धि देउनी सूज्ञ करी तूं आपण असे ॥ दत्त० ॥ तुझ्या चरणीं ठेविती माथा चिंता मजला कैसि असे ॥ झडकरि येउनि दर्शन देईं तुकाराम हा विनवितसे ॥ दत्त० ॥

तिल्लाना ( ताल त्रिवट. )

धिरकिट तक धिर किटतक तोम तननननननन तोम् तनन-नन ताऽरे तदरदानी ॥ किटधा किटधा गीधितट गदिगन नग धिर किटतक तकधिर किटतक धडान् धा धडान् धा धाधा.

पद ( चाल—लावणीची. )

नंदगृहाच्या जवळ मुलींनों ॥ दिसतो रथ दुसरा ॥ कोणाचा हो दिसतो० ॥ धृ० ॥ प्रथम रथाचा ध्वज सखे मोठा ॥ दिसला गमला अक्रूर खोटा ॥ करुनी जाईल अमुचा तोटा ॥ नाहीं जगीं आसरा ॥ आह्मांला ना० ॥ नंद गृ० ॥ हरि गेल्या पासुनि नहाणें ॥ न सुचे मजला वेणि विंचरणें ॥ तेथुनि केवडा राखडी घालणें ॥ न करूं सण दसरा ॥ नंदगृ० ॥

पद ( मोड दादरा. )

कठिण नाहिं कार्यभाग हृदयिं योजिला ॥ चरणकृपें शोधुनि मी आणितों तिला ॥ धृ० ॥ वाद्य निपुण गायक जनीं, नर्तकजन संमेलनीं ॥ कानिं पडे मंजुळध्वनि, श्रवण करित सिंहासनीं, स्वस्थ असा, चरणकृपें शोधुनि मी आणितों तिला ॥ १ ॥

पद ( झिंझोटी—त्रिवट. )

संग घडो मज, दंग असो मन ॥ रंगमहालीं तुजसि रमाया ॥ धृ० ॥ बकुल पुष्प मी षट्पद तूं हो ॥ घे रस चोखुनी जाइल वायां ॥ १ ॥

पद.

प्रार्थितें मी आपणा यमराया, परम सदया, नका नेऊं मम पतिराया ॥ धृ० ॥ कशी राहुं मी पति वांचोनी ॥ अहाया भुवनीं, जग हें उदास मज लागोनी ॥ आतां मी करुं कवणाची सेवा, अगा हे देवा, अंतरला मज प्राणविसावा ॥ प्रार्थितें० ॥

ठुंबरी राग झिंझोटी. ( ताल—दादरा. )

पियांपानी न जागेदे मैं जगायोहरी रामामें ॥ इत बहे गंगा बिचमें काशीरे ॥ बोली बोली चिडिया रेहो बिरजबासी रामारे ॥ १ ॥

होरी. ( काफी—दीपचंदी. )

कांरे इतुकी बळजोरी ॥ मी परकी य नारी ॥ धृ० ॥ अडवूं नको मी सासुरवासी । परदेशी सकुमारी ॥ सासुसासरे नणदा जावा । यांची असे मज चोरी ॥ १ ॥

गजल. ( राग—कालंगडा. )

कत्तल करनेकू आशके निघे तलवार काफी है ॥ धृ० ॥ बागेईके जखम कर रहूं तेरा दिदार काफी है ॥ परेशा देखकर मुजकू झोले मइत नोन कर झ्योल ॥ शाफ-क्कहरबानीसे सुनका प्यार काफी है ॥

पद. ( भैरवी—दादरा. )

तिलोत्तमा सुंदरीनें ठकविलें मला ॥ धृ० ॥ कपटवेष धरुनि पहा डाव साधिला ॥ १ ॥ वचन दिलें काय करुं यत्न खुंटला ॥ १ ॥

तिलाणा. ( राग—त्रिवट. )

तोम् ताना दरदर तानोम ॥ दर नदीम तनन लाडरे तदर दानी ॥ चकली चकली दादर दीम तननननन, तोम् तनननन, दीमल ननन, लाडरे दाSSSSनी ॥

दिंडी ( राग लीलांबरी ताल—दादरा )

गोड वाणीनें जरी बोलिलासी ॥ अमुपशब्दांनीं बहु वर्णि-

ळेसी ॥ परि न होई ही साध्य तुला जाया ॥ व्यर्थ आपुली कां कष्टविसी काया ॥ १ ॥

पद ( कलंगडा–त्रिवट )

निष्ठुर मन कां मजवरि केलें ॥ धृ० ॥ सांग सांग प्रिय काय वर्तलें ॥ राग नको धरूं क्षमा करींगे ॥ कोमल मुख हें सु-कोनी गेलें ॥ १ ॥

दोहरा. ( पिलु–दादरा )

दिल किसीकू देना नहीं, दिलसे देना दिल ॥ नाहिं मिला तो नाहिं मिला, कम दिलसे मतमिल ॥ क्या पानीका बुडबुडा, क्या वालुकी भीत ॥ क्या खोजाका आसरा, क्या रंडीकी प्रित ॥

पद ( चाल–आम्रमंजरी तुला. )

कृतांत पुरुषा असा ॥ होसी निष्ठूर तूं बा कसा ॥ धृ० ॥ कमलदलीं जलबिंदुचि जैसें ॥ भाग्य नराचें चंचल तैसें ॥ खे-ळसि त्या सरसा ॥ १ ॥ नको रडूं बाळका असा तूं, तुझे स-कलहि पुरतिल हेतु ॥ राहिं उगा पाडसा ॥ २ ॥

होरी.

केंसी धूम मचाई रे, या ब्रिंदावनमें ॥ केसी धूम मचाई ॥ धृ० ॥ इत गोकुल उत मथुरा नगरी, बिचमें देत दुवाईरे ॥ श्रिं० ॥

पद ( चाल–आम्रमंजरी तुला अ० )

ऊठ गडे सत्वरीं ॥ सेवा शेवटची ही करीं ॥ धृ० ॥ डाग नको हा वैधव्याचा ॥ मज सोसेना विरह पतीचा ॥ केला निश्चय सहगमनाचा ॥ अग्नि पेटवी तरी ॥ १ ॥

ठुंबरी.

सैयां जाओ मोसे ना बोलोरे ॥ देखी तुमारी ये रीत ॥ धृ० ॥ बाटघाटमें रोकत हमकूं ॥ ओर गगरियां तोडो ॥ सैयां ॥ १ ॥

साकी ( रागजोगी, ताल धुमाळी. )

तुझ्या मधुर गानाच्या नादें वेडावुनि हा गेला ॥ जसा भूप

दुष्यंत पहा हा हरिणें ओढुनि आणिला ॥ जाऊं चल भार्ये आह्मां असती बहु कार्ये ॥ जाऊं० ॥

पद ( चाल पांडु नृपती जनकजया. )

बाळा तूं सुकुमारा ॥ मजपाशीं यईं जरा ॥ आलिंगन सु शरीरा ॥ देईं बा मला ॥ १ ॥ कोण तुझी मात तात ॥ कथ करी सकल वृत्त ॥ कोठिल तूं सांग सत्य ॥ भीशि कासया ॥१

पद ( रागिणी भैरवी ताल—त्रिताल. )

या विरहा कां भीसी ॥ राहुनि पति गृहीं अनुदिन वैभव का समाकुल होसी ॥ या विरहा० ॥ ध्रु० ॥ पाहुनि पावन पुरु परी सुत पूर्वदिशा रवि जैसी ॥ दीन वनीं वसणार मुनीचं आठवण येइल कैसी ॥ १ ॥

पद ( चाल—सखे अशी धरिशी )

हरी पदा तुझी सदा हृदयीं रे स्मरा ॥ भवार्णवा तरावया उ पाय हा बरा ॥ मोह पाशीं गुंतलासी व्यर्थ तूं नरा ॥ विषा परी विषयसुखा भुलसी त्या खरा ॥ संत संग पापभंग करुनी घे त्वरा ॥ तुकाराम हेंचि सांगे जोडुनी करा ॥ १ ॥

ठुंबरी.

मधुबनमें मरवा बोले ॥ दादुर्वाघन गर्जत घननननझं ॥ ध्रु० ॥ रात अंधेरी बिजली चमके ॥ पवन बोलत झरररझं ॥ ध्रु० ॥ मधुबन० ॥

पद ( चाल—अंजनी पर्वा न करी. )

ध्यान धरोनी श्रीहरि चरणीं भाव ठरोनी राहिं जरी ॥ नर जन्माचें सार्थक साचें नलगे घेणें कष्ट शिरीं ॥ स्त्रीधन साधन व्यर्थचि बंधन अंति नराला दुःखी करी ॥ हें जाणुनियां भग वंताचे पद भावें करुनि धरी ॥ संसारांतरिं कष्ट पडति शिरि परीं पदीरच धूळ खरी ॥ सुविचारानें वागुनि ज्ञानें अंति पहा ही मुक्ति पुरी ॥ १ ॥

पद. ( चाल—खचित बाई व्यर्थ. )

नकोग बाई या पुरुषांचा संग ॥ धृ० ॥ संसारीं तें नच मन यांचें ॥ करिती नाना ढंग ॥ १ ॥ सुशील गृहीणी परि न आवडे ॥ पर गृहिं उडविती रंग ॥ २ ॥ वेश्या जन ते विमुख करिती ॥ परि बनती निःसंग ॥ न० ॥ ३ ॥ घेउनि मधुपचि दुजे सेवितो ॥ कमलपुष्प तो भृंग ॥ न० ॥ ४ ॥

पद. ( ताल दादरा. )

लाल बागेच्या तूं माझ्या सगुण पोपटा ॥ स्वयं तुझी अधर धरा चुंबितां ओंठा ॥धृ०॥ सेज केली हौसेची मी मंचकावरी ॥ जाई जुई पुष्प कळ्या आणुनी सुंदरी ॥ तुम्ही कधीं याल तरी माझे मंदिरीं ॥ उठा चला जाऊंद्या मला बहार हा लुटा॥लाल०॥

अंजनिगीत.

नाथा मजला सोडुनि गेलां ॥ क्रोध मजवरी कांहो केला ॥ निद्रिस्त असतां या अबलेला ॥ कां न करें वधिलें ॥ १ ॥

पद.

नीरक्षीरालिंगनरूपी स्नान तुला तें घालोनी ॥ माझ्या अवलोकन वस्त्रांनीं टाकिन तव तनु झांकोनी ॥ त्वत्प्रीतीच्या रक्तपणाच्या कुंकुम तिलका लावोनी ॥ तव तनु लतिका यौवनपुष्पें घालिन तुजवर गुंफोनी ॥ चिंतनिं तूझ्या श्वास जाति ते धूपापरि घे मानोनी ॥ मदन पेटवी तनु कर्पूरा ओवाळिन तुज लागोनी ॥ नैवेद्यास्तव देइन माझा अधर घेइं अपुल्या वदनीं ॥ कपटाचरणा केलें त्याची क्षमा करीं हे हरिभगिनी ॥ १ ॥

पद.( चाल—दूर मी झालें या अंका )

न वर्णवे मज रूप तियेचें रमणिय फारचि तें ॥ इंदुवदन सकुमार मनोहर स्वरूपें लजावि तें ॥ चांपेकळिपरि नासिक सरला वदना शोभवितें ॥ अधर असे कीं विद्रुम सम तो नयन मृगापरि ते ॥ फणिकन्या ही दासी शोभति मोहक रत्नचि तें १

दिंडी.

बहुत दिन नच भेटलों सुंदरीला ॥ ह्मणुनि धरुनि बैसेल रु ष्टतेला ॥ करिन जेव्हां मी बहुत आर्जवाला ॥ पात्र होइन मग मधुर सुहास्याला ॥ १ ॥

पद. (चाल—बाळा जोजोरे कुळभु.)

उपवर मम झाली ॥ प्रिय दुहिता । आणुनि ध्यानीं आतां । योजी स्वयंवरा । नृपकुमरा । देउनि श्रम या शरिरा । यावे मम नगरा । धन्य करा । विनवी भीमक स्वकरा । जोडुनिया आतां ॥ १ ॥

पद. ( राग भुपाळी, ताल धुमाळी. )

मलिन वस्त्र परिधान करितसे उदास होवोनी ॥ सखी ही ॥ व्रत नेमाच्या कष्टें आली पांडुरता वदनीं ॥ दुरुत्तरें बोलूनी घालविली तेव्हांपासोनी ॥ सखीनें ॥ घातलि नाहीं वेणि ह्मणोनी गेली गुंतोनी ॥ निर्दय झालों मी इतका परि मज-ला आठवोनी ॥ सखीनें ॥ एक सतत विरहाचें व्रत तें चाल-विलें करुनी ॥ मलि० ॥ १ ॥

पद. ( मांड—दादरा. )

हे दोन दिवस जातों अम्हि संगमेश्वरीं ॥ धृ० ॥ या दक्षिण प्रांतिं नसे स्थल तया परी ॥ मृगयेर्ते योग्य तेंच खचित सुंदरी ॥ १ ॥

ठुंबरी. बिहाग—त्रिवट.)

रात्रंदिन मज चैन पडेना ॥ भ्रांत चित्त अति कांहिं सुचेना ॥ ॥ धृ० ॥ कर जोडुनि मी विनती करितें ॥ जिव तडफड करी तनु ही कांपते ॥ सख्याविण मज धीर धरवेना ॥ १ ॥

पद. ( पिलु—जिल्हा दादरा.

प्राणसख्या चल आतां रंगमहालीं ॥ मदन अंगीं संचरुनी जहाली काहाली ॥ धृ० ॥ चरणीं तुझ्या जडलें चित्त जहालें चंचल ॥ सुंदर मुख तुझें दिसत ज्वानिचा पिळ ॥ मदन मूर्ति

सख्या तुझी कांति सोज्वळ ॥ होता मजसीं रूपगर्व भ्रांती फिटली ॥ १ ॥

बंजारा ( बिजलीची बत्ती. )

दावावी बत्ती बिजलीची ॥ पुरवावी हौस माझ्या मनाची॥ध्या रजा चला मुंबईला ॥ करा थाट तुम्ही अलबेला ॥ मला आ-वड बकुळि साडीची ॥ पुरवावी० ॥ १ ॥ बोरीबंदर स्टेशन पाहूं ॥ मग गोदी बघाया जाऊं ॥ आगबोट चाले वाफेची ॥ ॥ पु० ॥ राणिचा बाग मज दावा ॥ तिथें आहे सिंहाचा छावा ॥ पाहुं चला मजा गिरणीची ॥ पु० ॥ ३ ॥ महालक्ष्मी देवी थोर ॥ पलिकडे वाळुकेश्वर ॥ होडींत बसुन हवा दर्याची ॥ पु० ॥ ४ ॥ मुंबादेवीचें ध्यान ॥ करुं भुलेश्वरासी नमन ॥ फणसवाडींत मजा रात्रीची ॥ पु० ॥ ५ ॥ नार खुष झाली गमतीनें ॥ गळा मिठी घालि प्रेमानें ॥ पुरविली आस दी-नाची ॥ पु० ॥ ६ ॥

पद ( चाल-उर्दु. )

सुंदर उपवनीं ह्या आजी सुखवूं सखीला ॥ नृत्य करूं रंग भरूं तोषवुं सकलाला ॥ धन्य सुदिन हा प्राप्त जहाला ॥ १ ॥ न-वपल्लव युक्त लता जेविं तरूला ॥ शोभतसे तेविं सखी आजि पतीला ॥ जगदीशा अतर्क्य तव लीला ॥ बहार करूं नृत्य करुं तोषवुं सकलांला ॥ २ ॥

लावणी ( राग-बिहाग ता. त्रिवट. )

नादर सुंदर सखये रूप तुझें, तुजवीण मजला चैन नसे॥धृ०॥ चंद्रबदन मृगलोचनी तूं भुंवई धनुष्याकृति शोभती, अधर तुझे बहु गोजिर वाणे, नथ नासाग्रीं साजे ॥ नादर० ॥

धृपद ( राग बिहाग. ताल तेवडा. )

लाल मैं तो जान न देऊं पनछन रंग मचाऊं ॥ भर-भर मुठी त-कतक मारत सोही रंग बिगाऊं ॥

लावणी ( राग– कालंगडा. ताल धुमाळी. )

तुम्हीं झुरे बावरे फंदि मुशाफर दिसतां ॥ नवी नवल परा कोणें ठिकाणीं असतां ॥ झरझरी मुखाशीं लाऊनी खुशालींत बसतां ॥ भरजरी पठाणी साज बोलत असतां ॥ चाल ॥ चौं बदिपाई त्याकडे बांधिला घोडा जी जी ॥ जीन साज सोनेरी वारु सजविला घोडा जी जी॥चाल तिसरी॥लाल बागेची लुटा बहार आज सारी ॥ पहा स्वार होऊनी या दिल्ली शहराची बहारी ॥ तुम्ही छेल छबेले मी देखणी भारी ॥ चाल पहिली ॥ रहा ख्यालि खुशाली मधिं अशा नगरासी ॥ कर आठ चार दिस मुकाम मग जा देशीं ॥ तुम्ही पंची मुशाफर कोण कुठिल रहिवाशी ॥ वैराग घेऊनियां निघाला कोणें कार्यासी ॥

ठुंबरी ( राग देस. ताल झंपा. )

अहो मारी वेग सुनलीजे अजी महाराज ॥ अंकबकीमै उभी उभी ठाडी मैं दरबाजे ॥ अरज करे सामलो राज ॥ १ ॥

होरी ( राग देस. ताल धमार. )

कैसी होरी खेलत किसन कनैयां ॥ अब कैसी जाऊं मेउन सौंग दैयां ॥ धृ० ॥ भरभर पिचकारी रौंग मचाऽऽवत बैयां ॥ पकर बरजोरी करत ॥ १ ॥

पद. ( इंग्रजी. चला चला जाऊं पाहूं. )

माय डियर लेटस गो टु सी बाँबे ॥ आय शाल बि व्हेरि हॅपी बाय देट वे ॥ माय० ॥ धृ० ॥ फर्स्ट वुई शाल सी आपालो बंदर ॥ वुई देन एंटर राजाबाईटावर ॥ इट इज व्हेरी नियर हायकोर्ट फेअर ॥ प्रिन्सआफ वेल्स इज इन धि वे ॥ आय० ॥ १ ॥ एल्फिस्टन सरकल वुई देन एंटर ॥ ए ब्युटिफुल गार्डन इन धि सेंटर ॥ टाऊनहाल मिंट ब्यांक नियर दॅट सेंटर ॥ मेनि बिल्डिंग्ज् आर राउंड इन धि वे ॥ आय शाल० ॥ २ ॥ बोरीबंदर रेलवे स्टेशन ॥ फ्रुट मार्केट ॲन्ड

साल्व्हेशन ॥ पीस गुड्स मार्केट वुइथ गुड एन्ट्रन्स ॥ नियर पा-
यथोनि सिट इन ट्रामवे ॥ आय शाल बि व्हेरी हॅपी बाय देट वे॥२

लावणी ( राग—छायानट. धुमाळी. )

नारी नजर तुझी गहिरी ॥ निरखुनि पाहतां सहजचि होती
तनु सहिरी बहिरी ॥ १ ॥ कटिला शोभे शालु हिरवा ॥ वेणी
मध्यें झुमझुम झुम करी मरवा ॥ मुरडत ( ठुमकत ) चाले सो
बेपरवा ॥ वाटे सहजचि कठिन कुचावरी फुटेल सुपारी ॥
पूर्ण कलीचा उदय जाहला सांप्रत भूमावरती ॥ कनक का-
मिनी माया मोहें असंख्य जन हे फसती ॥ पुण्य लया गेलें ॥
अघोर पातक संचरलें ॥ धृ० ॥

( ठुंबरी. परज )

बन्सी बजा जारे ॥ कन्हया जरा बन्सी ॥ जमुनाके तीर ॥
कन्हया जरा बन्सी ॥ धृ० ॥ बन्सी बजाई मोरी सुद बिस-
राईरे ॥ कन्हया जरा फिर के सुना जारे ॥ जमुनाके० ॥१॥

( ठुंबरी धनाश्री. )

सुंदर सुरा जनवा सांईरे ॥ सांईरे मम भाईरे ॥ सुंदर० ॥धृ०॥
तुम बिन मैं तो कलन परंतु है आन मिले रवसांईरे॥सुंदर॥१॥

पद. ( चाल—ही यवनाची जात. )

या नरावरी भरंवसा तरी कोणी ठेवूं नये या जगांतरीं ॥
मुळिं कधीं तरी ॥ आह्मि पतिव्रता ॥ जगतीं असतां ॥ प्रिय
स्वतंत्रता ॥ नच देति खरी ॥ धृ० ॥

ठुंबरी.

एक पल निंद न आवे ॥ आवे दय्यां एक ॥ धृ० ॥ शाम सखे
री मिल येई बखतु है ॥ प्रीत लगावे पचतावे पचतावे ॥ दया
एक० ॥ १ ॥

ठुंबरी.

श्रीरघुवीर तुमारो दरसन बिन अखिया प्यासी ॥ दरसन
बिन आखिया प्यासी ॥ श्री० ॥ धृ० ॥ आजि तुमारो चरन

सरोज रामा ॥ काटो हमारा फासी ॥ श्री० ॥ पतित पावन नाम तुझें रामा ॥ तुम पतितनको प्यासी ॥ श्री० ॥ २ ॥ तुलसी नारायनकी अरजी सुनो रामा ॥ आजि अजोध्यावासी ॥ श्री० ॥ ३ ॥

तराणा. ( राग देस ता० त्रिवट )

तानोम तनदरेना तनदरना तनदरना तदर दानी दीम्॥नादर दर दानी तुंदर दर दानी तदरे दानी दीया नारे तोम् तानोम् तक डान् धुम किटत् कडान्धा ॥ १ ॥

टिपरी.

गजाननाची करुनी स्तुती ॥ खेळ खेळतों मंदगती ॥ १ ॥
गजाननातें आधीं नमुनी ॥ जाय पदांबुज वंदोनी ॥ २ ॥
गोपी ह्मणती ऐकमेकीला ॥ गुण रूपें आह्मीं भुलवीला ॥ ३ ॥
राधा चिमणी ठकू यमनी ॥ खेळ खेळती कुंजवनीं ॥ ४ ॥
चक्राकारें नांचती ॥ चक्रधराचें यश गोपी ॥ ५ ॥ गोपी ह्मणती एकमेकीला ॥ हवा तसा वागवूं याला ॥ ६ ॥ शालू नेसुनि अंजिरी ॥ कृष्ण वाजवी खंजिरी ॥ ७ ॥

पद. ( चाल–झाली ज्याची उपवर. )

कोण तुह्मी हो कोठुनि आलां ॥ भयभित कां मनिं फारचि झालां ॥ ध्रु० ॥ काय असे संकट आपुल्याला ॥ कृपा करुनिया सांगा मजला ॥ कोण० ॥ १ ॥

साकी. ( राग–जोगी, ताल धुमाळी. )

उभय मुलांचा जोडा कैसा फारचि दिसतो नामी ॥ तरी सुभद्रे खचित वत्सला देइन तव तनया मी ॥ उपवर ही होतां । अन्य हिला वर न पहातां ॥ धृ० ॥

पद.

मला ती सुंदरी भेटेल काय ॥ धृ० ॥ क्षणिक सुखासी देउनि गेली ॥ गुप्त मंदिरीं कोठें ठेली । मजसी लागे हाय हाय ॥ मला० ॥ १ ॥

पद. ( चाल—वृक्षवेल या दोहोंची. )

या तरुणा तांबुल द्यावया लाज वाटते ॥ धृ० ॥ आम्हांहि नाहीं परिचय याचा, प्रथम आजचि पाहिला ॥ ह्मणुनि मना धीर न होई, तूंच गडे दे हा त्यातें ॥ १ ॥

पद. ( चाल—नृपतनयेवर हें मन माझें. )

दंग होउनी रंगेले जन पिचकाऱ्या घेउनि हातीं ॥ रंगाच्या किति धारा सोडिति वेश्यांच्या अंगावरती ॥ धृ० ॥ पूर तो पहा चालला क्षिती ॥ चिखल अंगणीं जाहला किती ॥ तरुण तरुणिही त्यांत खेळती ॥ प्रेम आपुलें व्यक्त दाविती ॥चाल॥ मज गमती ॥ रम्य किती ॥ धन्य असति हे या जगतीं ॥ ॥ दंग० ॥ १ ॥

पद. ( चाल—दिसली पुनरपि गु० )

देउनी अर्धें शरीर आपुलें तोषवी आजि सिंहाला ॥ हेंची मागणें आहे राजा मुक्त करीं मम पुत्राला ॥ धृ० ॥ दशरथ वंशीं सीतावल्लभें, निजपुरुषार्थ दाखविला ॥ यमें नेतां द्विज-कुमरासी, रामें आणुनि दिधला ॥ जहालेलें जें दुःख असे तें, कथन करावें भूपतिला ॥ या न्यायें तुज येउनि वदलों, करि कीं न करीं कार्याला ॥ देउ० ॥ १ ॥

पद.

चंद्रमुखावरी मार धनूपरी वक्रभ्रुलता विराजिती ॥ नेत्र नव्हत हे मीनचि केवळ कज्जलयुत बहु झगझगती ॥ धृ० ॥ निज-स्वरुपानें गमते मजला रति गर्वाची करि माती ॥ वेणी पाहुनी वाटतसे कीं पुष्पसुगंधें अहि डुलती ॥ चंद्र० ॥ १ ॥

पद. ( चाल—कोई हाल कहो जाके. )

अरिनें काय दशा केली ॥ माझी कपटानें ॥ धृ० ॥ मंचकीं निद्रावश मी फार ॥ पाहुनी आला सदनीं चोर ॥ नाहीं तरि त्या वधितों ठार ॥ देउनी मार पोटभरी ॥ अ० ॥ १ ॥ रसिका सुंदरी सद्गुणखाण ॥ नाहीं मजला तिजविण त्राण ॥

गेलों विसरुनियां तनुभान ॥ अहा मत्प्राण हळहळती ॥ ॥ अरि० ॥ २ ॥

दिंडी.

एकमेकांशीं लावुनियां अंगा ॥ गालगालाशीं भुजाभुजा संगा ॥ काढितांहीं त्या गोष्टिच्या प्रसंगा ॥ मनीं नाहीं आणिलें प्रेम भंगा ॥ १ ॥

पद. ( चाल–सांब सुराभरणा )

करुणा कर ईशा ॥ तोडीं ॥ अघसंकटपाशा ॥ दीन दयाघन ब्रीद तुझें मग ॥ रुष्टशि मजवरी कां जगदीशा ॥ धृ० ॥ भवसागरिं त्राता ॥ नाहीं ॥ कोण मला नाथा ॥ श्रमलों तुज ध्यातां ॥ नाहीं ॥ त्राण पुढें आतां ॥ घाबरला जीव रक्षीं हा ॥ तव बाळकृष्ण विठ्ठल सर्वेशा ॥ करुणा० ॥ १ ॥

पद. ( चाल–बलसागर० )

धांव जगद्गुरू दत्तराय करीं माया अजि देवा ॥
पाहुं नका मम अंत प्रभू घडो मज सेवा ॥
तुजवीण मजला कोणि न जाणुनी मागतसें मेवा ॥
मूढ मती मम निरसुनि दे तव नाम सुचिर ठेवा ॥
चरणीं शरण तव आलों सखया धरुनि मनीं हेवा ॥
बाळकृष्ण विठ्ठल तुज विनवी आश्रय मज द्यावा ॥

साकी.

फुगडी खेळत असतां श्रीधव मसलत मनिं आणोनी ॥
राधामुखविधा चकोर श्रीधर गुप्त होय तेथोनी ॥
राधासहित वनीं ॥ व्यर्थचि आलों या स्थानीं ॥

पद. ( चाल–उरला भेद न० )

शरिरामध्यें शिरकमला ॥ मुख्य स्थानचि भूपाला ॥ धृ० ॥ मग करी केविं वंचनेला ॥ त्वत्प्रिय भार्या पाकाला ॥ ठेवुनि सुतशिर खुंटीला ॥ पचवी कशि ती देहाला ॥ सुपाकचि ल–

वणाविण केला ॥ घडलें कवण्या समयाला ॥ चाल ॥ आणींव येथें शीर मुलाचें कांडण करण्याला ॥ बोलावीरे चांगुणेला ॥

पद. ( चाल—वीरशिरोम० )

शूर वीर क्षत्रिय स्त्री असुनि शोक हा कांगे असा ॥ लावितो ईश्वर आपणां कसा ॥ धृ० ॥ हेम तावुनी त्वरित निवडिती मूल्य वर्ग तो जसा ॥ उठवि जें लोकमनावर ठसा ॥ चाल ॥ मग अलंकार ते त्यांचे जन बनविती ॥ त्यां नानापरिचीं नामें ही अर्पिती ॥ कधिं आटवितां त्या पूर्वील हेम स्थिती ॥ चाल ॥ तैसी ही जग राहटी तेथें शोक व्यर्थ कायसा ॥लावि०॥

पद. ( चाल—तकदीर हमारी )

महाराज आज आपुली ही दीन किंकरी ॥ हा हेतु अंतरीं धरूनि प्रार्थना करी ॥ धृ० ॥ अवरंगजेब बादशाहाशीं लढूनियां ॥ अति श्रांत जाहलां अहांत आपण प्रिया ॥ विश्रांति कशी न स्वप्निं आपणां ह्मणूनियां । दोन दिवस जाऊं चला संगमेश्वरीं ॥ महा० ॥

पद.

प्रिय जन कपट कसें आचरती ॥ धृ० ॥ एकांतीं असतां मधुर भाषणीं प्रेम जरी दाखविती ॥ प्रि० ॥ घातुक जन हे ऐसीं मजला आली आज प्रचीती ॥ प्रिय० ॥

पद ( चाल—शिवसांब. )

राम स्मरावा राम ॥ सदोदित ॥ होत मना आराम ॥ सदोदित ॥ राम स्म० ॥ धृ० ॥ मंगल दायक नाम प्रभुचें ॥ देत असे निजधाम ॥ राम० ॥ १ ॥ भव भय भीती उरत नसे ती ॥ पूर्ण करी श्रीराम ॥ रा० ॥ २ ॥ ध्यायी तुकाराम प्रेमानंदें ॥ बलवंतचि तो राम ॥ रा० ॥ ३ ॥

पद—राग खमाज—ताल—धमाळी )

दत्तदिगांबर करुणासागर । मूर्ति निरंतर स्मर मनिंरे ॥ त्रिभुवन व्यापक सुरनर रक्षक । भवभयहारक पाहिंरे ॥ धृ० ॥ दंडक

मंडलु हांतीं असोनी । अवदुंबर तरु छायींरे ॥ गाणगापुर स्थान करोनी ॥ भक्त तारिले बहुतचिरे ॥ दत्त० ॥ दत्त द अशी चतुराक्षरि ही । वाणीं निशिदिनीं जपतांरे ॥ स संकटांपासुनि लौकरि । मुक्त होशिल मनुजारे ॥ दत्त० ॥ १

पद. ( चाल–अभिनव मधु लालुप हे. )

खचित सये नंदन तव करि बहु रळी ॥ धृ० ॥ आंवळुन कुच तो धरी ॥ चुंबन मग देत हरी ॥ निज बळेंच येउनि घरीं ॥ दधि दुग्धा भक्षण करी ॥ चेंडू दे वदुनि असें पडतरे गळीं ॥ १ ॥ करुनि हास देइ त्रास ॥ सांगूं कुणा मी दु जास ॥ कळतां ग्रहिं हें पतीस ॥ करूं उपाय काय त्यास । सासु जीव जाइ तों मम गळा पिळी ॥ २ ॥ ऐसा हा दु बाई ॥ सोसवे न सांगूं काई ॥ तुकाराम नित्य गायी । हरि पदासी हृदयिं ध्यायी ॥ ताराया भक्त जनां कवण तो बळी ॥ ३ ॥

पद. ( चाल–वाडवडिलां सेवीत० )

वायुगतीनें कुंडल हाले ॥ डोळे मोडीत राधा चाले ॥ धृ० ॥ बघुनी तियेसी श्रीकृष्ण भुलले ॥ वृषभ दुहीतो गेहीं आपुले ॥ ॥ १ ॥ राधा मनिं तेवीं वेडचि भरलें ॥ निज मंदिरिं रिक्त डेरा घुसळे ॥ २ ॥ तुकाराम मन हरि पायीं रतलें ॥ पाहुनि सुख सज्जनांसी मिळालें ॥ ३ ॥

पद.

स्वमानें वा नयानें शिरीं ठेविन मी सुंदरिला ॥
हृत्सदनीं वास करी सुररमणी ती विमला ॥
कमलोद्भवकर शिणला बनवुनियां कामिनिला ॥
रतिकांता मारिसि कां कामशरें तूं मजला ॥
एकांतीं लाजसि कां सत्वर ये भेट मला ॥
तुजविण प्रिये कोणी नसे सुंदरी या भूपतिला ॥

पद. ( चाल—आला वनमाळी रात्रीं )

वाट बघत द्वारिं उभी कंठुं कशी दुष्ट निशा ॥ दयित जना रंजविती किती रमणि कामवशा ॥ धृ० ॥ दया नसे नरा जरा खऱ्याच भाबड्या स्त्रिया ॥ कार्यसाधु फसविति हे करुनि पहा कपट क्रिया ॥ करुनि झोंप मोड तुझी दवडुं नका फुकट निशा ॥ वाट ब० ॥

दिंडी.

सख्या खेळाया कुठें गुंतलासी ॥
येइं चिलया धांवूनि ह्या स्थलासी ॥
एथ बघ हा यति वाट तुझी पाहे ॥
येइ घेइ दर्शना जननि बाहे ॥

पद. ( चाल—आजि शेव० )

क्षणभरि धीर धरा कोपुं नका यतिराया ॥ नमितें मी तुमच्या पायां ॥ धृ० ॥ अति मूर्च्छा पहावी आलीसे भूपा या ॥ देतील सावध होउनियां ॥ चाल ॥ सुत सत्वाहुनि प्रिय नाहीं ॥ इच्छा पुरवूं ती लवलाहीं ॥ चाल ॥ न सुचे कांहीं मला पाहुनि पति स्थितिसी या ॥ नमि०

पद. ( चाल—निज रूप इ० )

मनमोहन दिलका प्यारा ॥ माता जसोदा हलावे पालना हातमें लेके दोरा ॥ धृ० ॥ आंगनमो कबसे खडी राधा ॥ देखे किसनका चेहरा ॥ १ ॥ तुकाराम प्रभुजीके चरणपर ॥ है होगया बलहारा ॥ २ ॥

पद. ( चाल—गभ्र्यांची. )

शरीर त्वां दिलें । मुला सत्व राखिलें ॥ धृ० ॥
येउनियां ममोदरांत ॥ मिळविशि कीर्ति जगांत ॥ व्हावा तुज ऐसा सुत ॥ जनन तरी भलें ॥ मुला० ॥

पद. ( चाल—नोहे नारीही० )

ताता तव दुःखें दुःखित ऐसे ॥ सुत आह्मी हरिसें ॥ बकावली

सुमन यत्नें आणूं श्रमहि न मानूं वच हें वरिसें ॥ ताता०
॥ धृ० ॥ शोधूं आकाशीं खगरूपानें ॥ आणूं धैर्यानें ॥ पा
गिरिकंदर चौदा भुवनें ॥ अमरांचीं स्थानें ॥ जाऊं पाताळ
पराक्रमानें ॥ सुमनास्तव सुवनें ॥ दशहि दिशा धुंडुनियां
सुमन आहे तरि तम दवडूं रविसे ॥ ताता० ॥ १ ॥

अंजनीगीत.

घेउनि कशी मी करीं सुरीला ॥ कापूं तुझ्या या शिरकमलाला।
रक्षुनी गर्भी असतां तुजला । मारुं कशी आतां ॥

पद.

मजवरी हें आलें संकट कैसें । मित्रा नच कळलें ॥ धृ० ॥
उत्तम कुलिं तूं जहालिस कांते । काय तुझी गती होइल वि-
मलें ॥ मज० ॥ १ ॥ बाळा सकुमारा कुमारा ॥ हृदयानंदकरा ॥
बाळपणीं तूं खेळ सुखानें॥कांहीं न आतां सौख्य उरलें॥मज०॥

पद. ( चाल—नोहे नारीही० )

नमुनी गिरिजाधव मदनारी तो ॥ अघनग संहरितो ॥ ध्यान
मान करी देत सुमती मनें भ्रांत शांत सुखदायक प्रभु तो ॥धृ०
स्वांगी संगीतारंगी राया ॥ इंगित पुरवा या ॥ शृंगी भृंगी-
सह प्याया ॥ सुसंगित व्हाया ॥ संगीवामांगी हिमनग तनया ॥
गंगा आदिमाया ॥ गानान्वित सुमन गुच्छ सुजन करि अर्पाया
ये त्र्यंबक स्तवितो ॥

पद. ( चाल—शैवाले यु० )

पानियां जात होतें तिथें भेते सांवळा ॥
दोयिं तोपी मयुल पिछांची खांचावली कांबला ॥
लडतां मी थालंगपानी कुनिकुन गे पातला ॥
निव्लत्ती बगुनीयां थामासी लाघला ॥

पद. ( चाल—व्यर्थ आह्मी अ० )

नहीं रहने सकता ॥ हम तो ॥ धृ० ॥
काहेकू लेती तकलीफ खाली, गुरु आदेस जाता ॥
बिलासमंदिर हो या अमृत, बात न कछु सुनता ॥

पद. ( चाल—अरसिक कि० )

जिवलग तूं माझा प्राण ॥ शाम कोमल रूप चिद्रत्नाची खाण ॥ श्रीहरि तुझी मज आण ॥ मी तुजवीण कांहीं न नेणें मनिं जाण ॥ अससी तूं सकल सुजाण ॥ हो तुकाराम हृदयविहारी रममाण ॥

अंजनीगीत.

रम्य दिसे ही गोरखबाळी । सरळ नासिका विशाळभाळी ॥ गौरांगासी सुगंध चोळी । आंगीं मद चढला ॥ १ ॥ अधररंग हा पोंवळ्या वाणी । सुहास्यवदना मंजुळ वाणी ॥ अति चंचळ हें लोचनपाणी ॥ बघुनी मृग झुरला ॥ २ ॥ गाल मनोहर गुलाब रंगी । पाहुन होते तळमळ अंगीं ॥ वर्तुळ कुचयुग हृदयाभंगी । कनककुंभ वाटे ॥ ३ ॥ अनुपम शोभा ह्या सुंदरिची ॥ बारीक कंबर बघुनि जियेची ॥ सिंह आदरी वस्ती मनिंची । वानुं किती हिजला ॥ ४ ॥

पद. ( चाल—शशिकुल भूषण गुणवंता० )

प्रभुवर राखिल तुजराया ॥ शोकें शिणवूं नको काया ॥धृ०॥ संकट हर्ता ईश असे ॥ तयाला दुर्घट कांहीं नसे ॥ तुष्टवित्या प्रति उल्हासें ॥ येतिल नेत्र पुन्हां खासे ॥ चाल ॥ बकावलीचें पुष्प मिळवुनी ॥ लावी नेत्रां या ॥ होतिल दिव्य न हो वांया ॥ प्रभुवर रा० ॥ १ ॥

पद. ( चाल—आवड तुला बेलाची )

मेरे आंगनमें मुरली बजावोरे ॥
खिलावना देउंगी ॥ धृ० ॥
नाच मेरे मनमोहन मधुर गीत सुनाउंगी ॥
तुकाराम श्रीहरी चरना बल जाउंगी ॥ १ ॥

पद.

नृपतनयेवर मन हें माझें बहुतां दिवसां पासोनी ॥ गुंतुनि गेलें ह्मणोनि ऐसा पिशाच गेलों मी बनुनी ॥ मी हिचा पती

या जगीं असें ॥ ह्मणुनी इजसीं मी संग करीतसें ॥ आजवरी पहा घेतले जरी बळी ॥ सोडुनी दया बहुत नरबळी ॥ मन रमणी, नवतरुणी । किती करूं तव मनधरणी ॥

पद. ( चाल—वैशाख मासीं० )

सौगंध मंद स्पर्श देह पावता ॥ मन्मथ बहु होय सखे त्रास अर्पिता ॥ ध्रु० ॥ दिव्य सुमन हार करीं कंठीं घालूनी ॥ त्रयोदशगुणि तांबुल तो वदनीं सेवुनी ॥ निजपतीस आलिंगिती चित्तीं हरिखुनी ॥ खचित सये कथितें मी धन्य योषिता ॥

पद.

जरि नाहीं कमल तें करीं, तरि ही सुंदरी, दिसे दुसरी ॥ कामुका इंदिरा खरी ॥ ध्रु० ॥ ही कामाची तलवार, करिल ज्या वार, ठार तो समजा ॥ नव मदन मंजरी उमजा ॥१ ॥ ही वारी कुलकामिनी, सहज ही बघुनि मूर्ति नयनीं ॥ झुरणीस लागती मनीं ॥ २ ॥ ऐसी लीलावती कराया रती प्रियाग्रह ती ॥ चालली नटुन गजगती ॥ ३ ॥

पद. ( चाल—तूं न कुमला जीयरवा० )

सोडीं चिंता धीरानें हे पृथ्वीनाथा ॥ सोडीं चिंता धीरानें ॥ असुखी सुत हे असती व्याकुळ सोडीं चिंता धीं० ॥ ध्रु० ॥ सकलहि औषधि यत्नें आणूं वारूं कटानें ॥ असुखी० ॥१॥ तोषवूं देवहि तीव्र तपानें ॥ मागूं नेत्र हटानें ॥ असु० ॥ २ ॥

पद. ( चाल—लग्नाला जा० )

लपुनियां न पाप जाण रहातें ॥ उघडकीस येतां मग सर्व समजतें ॥ ध्रु० ॥ राजद्रोह होउनियां । समजे जरीं राज्ञिस या ॥ कैद तुला करुनियां । शिक्षा ती भोगुनियां ॥ काय नांव जगीं या मग सांग लाधतें ॥

पद. ( वस्त्रानें देह० )

जीव रतला गौण तेथें पद्मिण ही वाटते ॥ कारेलें अमृतातें कडु परि तें हिणवतें ॥ भीत नसतां एक वेळां कांहीं नसे तुच्छ तें ॥ मग भोगी जोगड्याच्या कशि शंका पावते ॥

पद. ( चाल--अरसिक किती हा शेला. )

त्यज जिवा अंध तनूला ॥ ही शोकांत तुजला ने विलयाला ॥ त्यज० ॥ धृ० ॥ मोहें ज्या कुमराला ॥ त्वां वाढविलें तो अरि नेत्रांला ॥ आला अकल्पित घाला ॥ तूं सोडोनि आशा जा स्वर्गाला ॥ तेथेंचि अर्चिं प्रभुला ॥ तो संकटीं कर दे भक्तजनांला ॥ त्यज जीवा अंध त० ॥ १ ॥

पद. ( चाल--या विरहा कां० )

इतनेमें मुनि आया ॥ धृ० ॥ सरन गया जब राजा उनकू जुगत कछू तब दीया ॥ १ ॥ लोह हेम रुपाका पुतला जलदी इन्ने बनाया ॥ २ ॥ खाई खोदके गुरुके भूसे अमर किया निज काया ॥ ३ ॥

अंजनी.

मनापासुनि वरिलें नसतें । अर्जुनि ठेविलें जित कां असतें ॥ मग घेऊनियां संशय भलते ॥ त्रासवितां चित्ता ॥

पद. ( चाल--जाई परतोनी, बाळा० )

दुःखित मी झालों, आतां दुःखीं० ॥ काय गति दैवाची नकळे अखिल सुखाप्रत कैसा मुकलों, दुःखित मी० ॥ धृ० ॥ पशु नायक तो महाभयंकर ॥ बंदी पडतां होई किंकर ॥ तीच गती झाली कीं सत्वर॥वनवासी बनलों,॥आतां दुःखित मी०॥१॥

पद. ( चाल--एक चतर नार० )

हें रूप बघुनी मन होत अधिर मारी मदन उरीं सुरी करीत चुर । पहा नयन फिरती किती गररर ॥ धृ० ॥ हें रम्य सदन तनु जाळी । गहन तरी उठूनि सुंदरी देई आलिंगन ॥ बांधी तनुस करपाश जबर ॥ हें० ॥

पद. ( चाल--विठाबाई माउलिग माय मा० )

सदाशिव या जना,सदोदित देवो शुभ वासना॥धृ०॥नाट्यानंदें डोलतसे जो, घेउनियां अंगना सदोदित दे० ॥ १ ॥ भवभय निरसुनि करुणोदधि करि, सौख्याची योजना ॥सदो०॥२॥वरदायक शिव येतां ध्यानीं, करी विघ्नभंजना॥सदोदित दे०॥३॥

पद. ( चाल--झाली ज्याची उ० )

चिंता भास चितेहुनि दुस्तर । ताप तियेचा फार खरोखर ॥ धृ० ॥ मनुज पराक्रमी असो कसाही ॥ उद्भवते ती क्षणांत अतितर ॥ १ ॥ नरपति हो कीं रंक तयाचा ॥ चिंता रोग समान धरी कर ॥ २ ॥ या लोकिं चिंता न तनूला ॥ प्रसन्न झाला तो परमेश्वर ॥ ३ ॥

दादरा.

जान वरसो गुजरगई के मे ॥ जान ॥ हमारी संगकी दो दो खिलावे ॥ हम हुरही अंदेसे मे ॥ जान ॥

साकी.

चमके बिजली नीर न आवे मेघ नहीं है नभमें ॥
वहां उसको क्यौं तरा सहो के आये यहां जंगलमें ॥
हम निरंजन जोगी ॥ प्रभुका सुधा नाम भोगी ॥

पद.

शाहा जब मैं निकला घरसे आपके डरसे दहल दहल ॥
पहोंचा मैं फिर दौस तो देखा इन चारोंमें खलल खलल ॥
सब अलबेले जुआ थे खेले इस औरतसे सहल सहल ॥
हारकर इसकी कैदमें आये दागभी खाये मचल मचल ॥
झितकर इनको मैनें छोडाया इरमभा पाया खिलाचमन ॥
देवनी हम्मालाकी मददसे फुलभी लाया मगन मगन ॥
राहसे अंधे गदाकी मैंने सदा सुनी जब मदद मदद ॥
फुलसे आंखें रौशन कर दीं दोआकी हासेल हुइ सनद ॥
उस अंधेसे पता जो पाया इन्होंने दौडे झपट झपट ॥
फुल वो मुझसे छीन लिया फिर इन चारौंने लिपट लिपट ॥

पद. ( चाल--येतां राज्य तयाच्या हातीं )

वर हा आम्रतरू मानें भरला ॥ परि तो स्वीकारील का मजला ॥ याची शंका उपजे तिजला ॥ अशा या कालीं ॥ पाहिजे सखी कुणी जवळी ॥

पद. ( चाल—वस्त्रानें देह० )

जड झालें अंग डोळे जळजळती फार कीं ॥ क्लेशद ही स्थिति भासे मज आजी नारकीं ॥ रोगीही प्रभातीं या सुख पावे लौकिकीं ॥ असुखासी पात्र मी तें दर्शन हो भयमुखीं ॥

दादरा.

जमुना किनारे आहे शाम शामजी ॥ जमुना० ॥ शामहि गावे शामहि बजावे ॥ रंगमिले ओहि शाम ॥ जमुना किनारे आहे शाम शामजी ॥ १ ॥

पद. ( चाल—याहो सज्जन जनहो. )

वायां । शिणवूं नका ही जाया । दया करुनियां क्षमा करावी दासीला नृपराया ॥ माया । पातळ केली कांया । दीन दासिवर आग पाखडुनि करूं नका अन्याया ॥ न्याया । अनुसरुनि चालाया । महाकाळ चिरकाळ कालिका पूर्णायु करो भूपा या ॥ धृ० ॥

पद. ( चाल—जनक जननि भे० )

दोनशें पठाण हातीं घेउनी सुऱ्या तरी ॥ हिंदूतें चिरावयास येति पाहि सत्वरीं ॥ लष्करी शिपाई त्यास परतण्यास सांगती ॥ नायकिती ह्मणुनि जाण झोरक्यास मारिती ॥

साकी.

आस हमारी छोडके सखि सुखसे घरमें रेहना ॥ रखें सुखी प्रभु निसदिन तुजको और हमारे भीना ॥ रुस्कत पाताहूं ॥ असोक गुरु आदेस लेताहूं ॥

पद. ( चाल—सुवर्ण केतकी परि जो० )

नूतन रक्षित दासि आपली वाद्यचि वाजविते ॥
अभिनव बोला काढुनियां तैं मन्मन कांपविते ॥ धृ० ॥
अजि एकांतीं ह्मणुनीयां मी ते आपणा सांगतें ॥ चलो मछिंदर गोरख आया परिसावे बोल ते ॥ १ ॥

पद. ( राग मालकंस—ताल त्रिवट. )

वद वद वद वद मनुजा मधुर नाम वाचे । हर हर भव आप-

दासीं त्यजुनि भय जनांचें ॥ धृ० ॥ सावध हो करिशि काय जन्म अखिल व्यर्थ जाय । आठविं प्रभु जो हरि भय शरणागताचें ॥ वद० ॥ १ ॥ सोडुनियां लोभ सकल चित्त करुनि परम विमल । भक्तिरसें कर प्रेमल भजन मंगलाचें ॥ वद० ॥ ॥ २ ॥ अतिविनयें करुनि नमन अर्पुनियां हृदयसुमन । दृढ भावें करि पूजन जगद्वंदनाचें ॥ वद० ॥ ३ ॥

होरी.

मत मारो पिचकारी मैं तो सगरी भिजगईरे ॥ मत० ॥ उडत गुलाल लाल भये बादर ॥ केशर घागर फोरीरे ॥ ही तो पिचकारी मुखपर मारी ॥ भिजगई तनु सारीरे ॥

पद.

त्या प्रियधवा, त्वरित मज दावा ॥ जो मम प्राणविसावा ॥ हो सुख जिवा ॥ त्वरि० ॥ ध्यास सदोदित त्याचा लागे ॥ होत कडु गृहमेवा ॥ कोपत शिवा ॥ त्वरित म० ॥ तोषवुनि नृप चोर धराया ॥ गणिका वेष धरावा ॥ लागत नवा ॥ त्वरित० ॥

पद. ( काय मला भूल० )

माते तव वदन मजशीं म्लान कां दिसे ॥ चिंता तव हृदयीं कथीं कोणती वसे ॥ ईशकृपा सकल संकटाशीं हरीतसे ॥ ठेवि शांति त्यांतें अखिल सौख्य मिळतसे ॥

पद. ( चाल—स्वर्गा आणतिल पृथ्वी वरती. )

चार हजारांची मजुराची डोंगरीपाशीं टोळी येई ॥ नोलन जोन्स काव साबहे, पुसती त्यांते करितां कांई ॥ तैं ते ह्मणती सूड घेऊंया, जेणें आमुचे वधिले भाई ॥ झोकूं दुष्टां उदधी माजी, परवाना जरी आपुला होई ॥ धृ० ॥ मायबाप सरकार ते आह्मां, इच्छित नाहीं दाऊं बढाई ॥ पोलिस साहेब हांसुन ह्मणती, तुमचें रक्षण आमुच्या डोई ॥ यास्तव तुह्मीं जावें परतुन, आल्या पायीं ऐका कांई ॥ तैं ते आज्ञा मानुनि जाती, सायब ह्मणती हेच शिपाई ॥ २ ॥

पद. ( चाल—माझ्या मनिंचे हि० )

हतभागी हा दुष्ट पातकी नीच जगीं ठरला ॥ करुनि वनांतरिं अघटित मुख घेउनी आला ॥ धृ० ॥ स्वप्नीं ज्या परि तीन नरांचा घात करें केला ॥ त्यापरि विपिनीं मम हस्तानें साधुघात झाला ॥ वधिलें दोघां वृद्धां अंधां आणिक कुमराला ॥ ॥ चाल ॥ ऐशा कृत्या करुनी काळें केलें वदनाला ॥

साकी.

मेरे आवनसे गोपिचंद नृप राजलक्ष्मि खोवेंगा ॥ इस खातर मैं कभि नाहिं जानो मंदरको आवेंगा ॥ वहां नहिं मेरा काम ॥ सतावत काहेकूं है रामराम ॥ १ ॥

पद. ( चाल—रामाशी अनुकूल० )

स्वर्गा आणतिल पृथ्वीवरती पृथ्वी नेतील स्वर्गीच नारी ॥ पातालातील भू-स्वर्लोका फेंकून देतील सिंधूंत नारी ॥ रंकासी नृपपद देतील भूपा करितील रंक खचीतच नारी ॥ गंगा धरिती स्वशिरीं हर तो झाला कुंठित कीं मदनारी ॥ धृ० ॥

पद. ( चाल—परि शिवा न० )

मज इथुन प्रियकरा शीहिं जाउंद्या ॥ शंका मनिंची सोडुनि अवघी ॥ करा हवी ती चैन ॥ प्रिय० ॥ १ ॥
मंतु न केला तव मी शुभांगे ॥ ऐसें असुनि कां भरशिल रागें ॥
देवोनी प्रेमें आलिंगनातें ॥ वारि सकलही मम ताप कांते ॥२॥
पल्लव माझा झडकरि सोडा ॥ करा हवी ती चैन ॥ प्रि०॥३॥
संताप पीडा असाह्य ऐसी ॥ कांगे करोनी सखये तूं घेसी ॥
देई रतिसौख्य दासास आतां ॥ नाहीं तुजविणें सुखशांति चित्ता ॥ ४ ॥
सुखांत तुमच्या असुख मी आणिलें ॥ करा हवी ती चैन ॥ प्रि० ॥ ५ ॥

साकी.

सुपात्र शिष्यापासुनि जैसा आनंदा गुरु पावे ॥ तेविं मन्मन

होय प्रसन्नचि किति तरी त्वद्गुण गावे ॥ चंद्र सूर्य असती ॥ वोंवरि राहो तव कीर्ति ॥

पद. ( चाल—नच सुंदरी करुं कोपा० )

कोपूं नका यति अंतरीं ॥ भोजन देत्यें पतिकरीं ॥ होउनी शांत इच्छा मज कथन ती करीं ॥ धृ० ॥ चालुनि येशी बहु दुरी ॥ असतिल पद श्रमले तरी ॥ विश्रांति घे क्षण-भरी ॥ भोजन अर्पिन सत्वरी ॥ मस्तक हें चरणांवरी ॥ ठेवीं दया कांहीं धरीं ॥ यतिराया स्थित व्हावें आसनावरी ॥

पद. ( चाल—परम सुवासिक० )

कुटिल मंत्रिजन करिती भूपा अंध अशी रीती ॥ चालत आली परंपरेनें बरि नच ही नीती ॥ धृ० ॥ त्या योगें राष्टा-ची होते खचितचि ती माती ॥ परचक्राग्नि ज्वाळेमाजीं पडुनी आहुती ॥ प्रजा तोष हा भक्कम पाया आहे राज्याचा ॥ स-ज्जन संमत विचार भूपा हितकर हा साचा ॥

पद.

आहा आहा बकावली जान आईरे—आहा० ॥ चमन हमारा इरमका सारा पडाथाये सुनसान ॥ गुलोने मारा पलक इशारा आई उसमें जान आ० ॥ चमनके सब गुल बनफशा सुम्बुल हुवेथे कुल बरबाद ॥ खुशीसे बुलबुल करे हैं ये गुलचमन हुवा आबाद आ० ॥ गुलोंकी प्याली हुइथी स्वाली तरस तरस बेआब ॥ रुखोंपे लाली हुइ निराली बरस बरसके आब आ०॥

दिंडी

सुता चिलया धांवुनी शीघ्र येईं ॥ यती तुजवांचुनि अन्न नघे पाहीं ॥ उशीर होतो बघ तया भोजनाला ॥ येइं येईं धांवूनि त्वरें बाळा ॥

पद. ( राग मांड—ताल दादरा. )

सुखकर सुरुचीर कवन, नव सुनाटका । आद्य कवी श्री जैमिनि व्यास वाल्मिका ॥ धृ० ॥ भवभती कालिदास

कविशिरोमणी ॥ शूद्रक श्रीहर्ष बाण दंडी बहुगुणी । आधुनीक बलवत्कवि चिंतुनी मनीं । मंदमती माधव हा स्वकरिं घेउनी । सकल चरणिं अर्पण करि सुमन मालिका ॥ सुस्वर० ॥

पद.

असतांना यतिसंनिध किंचित् सुख वाटतें ॥ परि एकटि बसतां हाय दुःखें मन दाटतें ॥ चाल ॥ चार मास जाउनियां आतां येईल तो दिन मृत्यूचा ॥ ऐसें मानसिं येउनि शयनीं तळमळतें निशि सारी ॥ मग हें चित्त फाटतें ॥ असतां० ॥

पद. ( मंदिरीं मम चैन० )

कृष्ण वदन दाउं कुणा घेउनी असें ॥ एकहि पद नच उचले शक्ति मुळीं नसे ॥ जाउनियां नगरींत वृत्त सांगुं मी कसें ॥ प्रभु माझा पुनरपि तो मज कधीं दिसे ॥ दुर्वार्ता सकलांसीं करिल कीं पिसें ॥

पद.

दुर दुर परम अधम विषम उगम दुर दुर ॥ न वद पातकी शब्द हे असे ॥ वर वरावया योग्यही नसे ॥ चाल ॥ न शिव समज, धरुनि गरज नमितसे तुज हा मलंग ॥ हात धरी, काम करी सबळ नायकाची नारी ॥

साकी.

काष्टभार हा शिरावरती निराधार कीं आहे ॥ मस्तकाशीं स्पर्श न होतां निराळींच तो राहे ॥ मातें अवलोकीं ॥ वाटे नवल हें मज लोकीं ॥

पद. ( चाल--सूरतसे कीरत बडी. )

प्रीति-मेघ जला वर्षुनी विरहानल हा शांत ॥ करीं सुंदरी झडकरि आतां बघसि कितीगे अंत ॥ सुंदरी ॥ बघसि० ॥ दुःखानलिं मज टाकुनि गेलां ह्मणुनी स्मर मातंग ॥ निशिदिनिं मेला गांजित होता पाहुनि कोमल अंग ॥ प्रियकरा

विनय पुरे गुणवंत ॥ यथेच्छ करूं रतिसंग ॥ शक्ति नसे मज आतां किमपि पुरे पुरे नरछंद ॥ विषयवैरागी होसी परि मज अनंग करितो धुंद ॥ सुंदरी० ॥

पद. ( राग जोगी, ताल धुमाळी )

माझ्या मनिंचें हितगुज सारें ठाउक कृष्णाला ॥ ऐसें असुनि दुःखावरती देतो डागाला ॥ धृ० ॥ अर्जुनजीला मज द्यावी हें आपणची वदला ॥ आशा मज बहु दावुनि ऐसा घात करूं सजला ॥ जैसा वरती दिसतो काळा आंतुनही झाला ॥ तारिल ह्मणुनी धरिलें ज्याला बुडवी तो मजला ॥

पद. ( चाल—मजवरती खचीत आहे० )

मन मागें फिरें वेगें सुंदरिनें मोहिलें ॥ हृदयीं ती वसे तेही तिजपाशीं राहिलें ॥ सुप्राती गुप्त मारी शर जे ते लागले ॥ त्या योगें प्राण माझे सर्वस्वी भागले ॥

पद. ( राग बेहाग—ताल दादरा )

अहो हे सकल भूपती । भुतलावरी । गांजण्यास सज्जनांस खचित नांदती ॥ धृ० ॥ भरंवसा धरी । कोण यावरी ॥ कपट कुशल पूर्ण अदय चपल हे किती ॥

पद. ( भैरवी—दादरा. )

नृपाल कोप शांतवीन मी कशी ॥ स्त्रियांस वाली नाहीं ना जगांतरीं ॥ दुष्ट षडरिमाजि मदन नष्ट किति तरी ॥ अगे खुळे । शशिकले । कसाई टाकी कंठ चिरुन हा ॥ १ ॥

पद. ( चाल—कर गजानिधें मोल० )

प्रेमपाशीं या पडुनि योषिता व्यर्थ नरा फसती ॥ या जनीं ॥ छंद करीं मन धुंद सर्वदा निष्ठुर नरजाती ॥ या जनीं ॥ कामिनि वांचुनि नर हा उघडा व्यर्थ न करि कोपा ॥ सुंदरी ॥ या दासावर आनंदानें झडकरि करि अनुकंपा ॥ सुंदरी ॥ विनती नायकुनी अबलेची साहस कां केलें ॥ प्रियकरा ॥ समजुनि उमजुनि बळेंचि मजला दुःख तुह्मी दिधलें ॥ प्रिय०

फिरूनि ऐसें कधींहि न घडे दुःख किती करिसी ॥ अंतरीं ॥ तव आज्ञेनें राहिन आतां शपथ तुझी मजसी ॥ सुंदरी ॥ अखेर झाली खरी वैखरी प्रत्यय आलाना ॥ प्रियकरा ॥ कामातुर मी झालों पुढती शांत करी मदना ॥ प्रियकरा ॥

पद. ( चाल–नच सुं० )

गिरितनये हे चतुरे समजुनि कां हट्ट बरें ॥ द्युतातें निंदिति जनिं सज्जन ते सारे ॥ धृं० ॥ रमवाया मन जगतीं अन्य नसे कां रींती ॥ सांग सखे हे सुमती ॥ सोडुनियां कुमती ॥ कर्मणुकीतें असती बहुतचि पथ दुसरे ॥

पद.

होऊं गडेहो दास ॥ भावें होऊं गडे हो दास ॥ प्रभुरायाचे होऊं० ॥ धृ० ॥ पुरवि सुमनोरथ सद्गति देई जो ॥ धरुंहो तयाची कास ॥ प्रेमानें धरुंहो त० ॥

ठुंबरी.

जियाकी लगींरे कहुका जानेरे दैया ॥ जिया० ॥ जिस तन लागे वारी आहित न जाने ॥ दुजि क्या जाने भला दैया ॥ जिया० ॥ १ ॥

पद. ( चाल–आज अक्रूर हा० )

प्रियकर माझा तो भेटो मजला आतां ॥ लागली फार मनीं चिंता ॥ त्यावीण मला नसुचे तळमळ होते ॥ मूर्ति ती उभी शि दिसते ॥ मी भेटाया साठीं धावुनि फसतें ॥ मग वेड्या ऐशी रुसतें ॥ चाल ॥ मी शोधिन आतां त्याला ॥ घेईन वेश पतकरिला ॥ परिहा विरह नको तापद होतो पुरता ॥ लागली फार० ॥ १ ॥

पद. ( चाल–टाकिला यानें० )

नक्राच्या दांतीं ॥ पाय अडकवीला ॥ आकांतचि थोर केला ॥ धृ० ॥ कौस्तुभ शिष्यानें ॥ जाउनि अंबेला ॥ कथिलें सर्व ही वृत्ताला ॥ नदितिरीं येतां बघुनि संकटाला ॥ तिचा जीव

शोकाकुल झाला ॥ तशांतुन मी बोलें ॥ करि संकल्पाला ॥ आज्ञा दे संन्यासाला ॥

पद.

या हो सकल भाविक जन ॥ करा भगवंताचें भजन ॥ ध्रु० ॥ जगदुद्धारक भवभयहारक ॥ करी सकल सृष्टीचें पालन ॥ या हो० ॥ १ ॥ विषयमोहाब्धीं बळेंचि बुडुनी ॥ कां भ्रमवितां आपुलें मन ॥ या हो० ॥ २ ॥ व्यर्थ अहंकार मनिं कां धरितां ॥ करा देहबुद्धीचें भंजन ॥ या० ॥ ३ ॥ सोडुनी मत्सर भाव मनींचा ॥ करा बंधुप्रीतीचें वर्धन ॥ या० ॥ ४ ॥ होउनि लिन नित्य निरंतर ॥ करा प्रभुचें कौतुकवर्णन ॥या०॥५॥

साकी.

क्रीडत असतां एक दिनीं सती शिवाप्रती तें सांगे ॥
मद्हृदयांतिल संशय फेडीं देवा इतुकें मागे ॥
तमा दूर करी ॥ मग इच्छा पूर्ण करी ॥

पद. ( चाल—भूपती खरें तें० )

गिरि किती तरि नेत्रास सुखाप्रति देतो ॥ भवदवानळिं दग्ध तनूस शान्त करीतो ॥ १ ॥ हिमनगाभिधा हा सार्थ धराधर घेतो ॥ निज शिरांहि हा आकाशिं गमें जणुं जातो ॥ २ ॥ किति मनोहर कैलास शिवाप्रति वानूं ॥ शिव वसे तिथें विश्वास शिवाप्रति देतो ॥ ३ ॥

पद.

हाल सुन ऐ समन परी, रात हुइ सितमगरी ॥ छोडी जो बजमें इन्दरी, ठैरी न मैं वहां जरी ॥ हाल० ॥ दिलकोथी मेरे बेलकी, घरको मैं अपने उड चली ॥ पाके पलंग मखमली लेट रही बुरी भली ॥ हाल० ॥ ख्वाब मुझे नजर पडा, दरियामें कोह है बडा । उसमें जाहाज है अडा, लालो अकीकसें जडा ॥ हाल० ॥ उसमें बशर जवान था, हुस्नो अदाकी जान था । साफ खुदाकी शांन था,हाथ लिये कमान था ॥हाल०॥

दिल मेरा छोड तन गया, शकले परींदा बन गया ॥ तीरे जवांसे छन गया, लेके बशर वतन गया ॥ हाल० ॥ मौजकी फेर हवा उठी, बर्कतपा घटा उठी ॥ कोह फटा सदा उठी खौफभरी बला उठी ॥ हाल० ॥ जागी तो बस पलंग है, और न कोई रंग है ॥ दिलमें न वो उमंग है, खौप जदाका ढंग है ॥ हाल० ॥

दिंडी.

कथन करि हें मज गुह्य भूतनाथा ॥ नम्र होवोनि ठेविं चरणीं माथा ॥ जन्म कैसा तुह्मांसि प्राप्त आहे ॥ तात मात कीं भ्रात कोणी नोहे ॥

ठुंबरी.

नथनीया झ्युलनया खागईरे ॥ अंतरा ॥ भय जोग येथी फुल वाबिन नको लच्यक लच्यक झोके खागईरे ॥ नथ० ॥

पद. ( तूं कोणाची कामिनी० )

रुतुवर विभवानें मन विलसे ॥ शशिकर शीतल किति तरी भासे ॥ वासवनंदन वनचि येथ येतसे ॥धृ०॥ उपकृति भर शिर साधु जनांचें, फलभर तैसा नमवि तरुंचें ॥ सुकिर्ती त्यांची सुगंध यांचें, द्वय हें एकचि मजसि दिसे ॥

पद. ( चाल—कहांके पथन कहां )

जन्म कां वृथा दिला तुह्मी तरी अभागिला ॥ धृ० ॥ दुःख सागरीं बुडाल ॥ वृत्त जरी आयकाल ॥ भूपतिनें कपट करुनि पूर्ण ठकविलें मला ॥ १ ॥ पतीविना गती नसे ॥ श्रुति स्मृति वदे असें ॥ दिग्वधु कशी नटे विना शशि सुमंडला ॥ २ ॥

पद. ( चाल—ठुंबरीची )

तुझा लागला ध्यास मज सुंदरी ॥ तव रम्य मूर्ती हृदयावरी ॥ धृ० ॥ खान पान मज गोड न लागे नये नीज मंदिरीं ॥

पद. ( चाल—भज भज भव० )

सदयहृदय मदनदमन दुरितशमन भोला ॥ धृ० ॥ विलसत

शिरिं शशिभूषण नाम जया नीलकंठ ॥ चरणशरणसंरक्षण ब्रीद हों जयाला ॥ सदय० ॥ १ ॥ शिवकर शिव यद्दर्शन सहज हरी पाप ताप ॥ निज नयानिंच अजि देखुन मजसि तोष झाला ॥ सद० ॥२॥ जप तप शम दम साधुन नित्य योगी राग धरी ॥ निज सतिसह अजि खेळून रंजवा तियेला ॥ ॥ सद० ॥ ३ ॥

दिंडी.

दैव अनुकुल तें सर्व साध्य होई ॥ लभ्य नाहीं ती वस्तु हता येई ॥ नाहींपक्षीं ह्या क्रूर राक्षसाला ॥ बुद्धि होतींना साह्य करायाला ॥ १ ॥

पद. ( राग धनाश्री—ताल त्रिवट. )

आनंदें येउनी शरण तुज देवा ॥ नाम प्रेमल तुझें गाऊं करूं सेवा ॥ ध्रु० ॥ क्रोध मत्सर काम त्यागुनियां यांसीं ॥ शुद्ध सुमनें अर्पूं तुझिये पायांसीं ॥ आनंदें० ॥ १ ॥ प्रेम सद्भाव भक्ति नैवेद्य हा दावूं ॥ तज्जनित आनंद मिष्टान्न हें सेवूं ॥ आनंदें० ॥ २॥ भजन कीर्तन तुझें हेंचि मुख्य काम ॥ संतोषें मनें भावें करूं हें निष्काम ॥ आनंदें० ॥ ३ ॥ कर्ता दाता त्राता तूंचि आह्मां महोदर ॥ दास एकरवें करूं तुझा जयजयकार ॥ आनंदें० ॥ ४ ॥

पद. ( चाल—पूरब पच्छम उत्तर दख्खन० )

अंजनपर्वा न करी पर्वी महेंद्र थरथर कांपतसे ॥ व्याघ्रापुढतीं जैसी धेनु आतमग्रीवा लववितसे ॥ ध्रु० ॥ हाहाःकारें अंबर भरलें रक्षि विक्रमा सुरललना ॥ वक्ष पिटीती दैना त्यांची कोणालाही बघवेना ॥ सुरवृंदाला तुजविण भूपा एक क्षण युग भासतसे ॥ दानवकंदन झाल्यावांचुनि सौख्य न कोणी पावतसे ॥ अंजनप० ॥ १ ॥

पद.

मना निस्सार संसारीं तुला आनंद हो भारी ॥ असे माया

परी सारी तुला कोंडील ती कारीं ॥ १ ॥ सहा जेथें तुझ्यावरती पहाऱ्यातें सदा करिती ॥ न सीमा यत्कौर्याला न ती भीती शिवे ज्याला ॥ २ ॥ मना होऊन निःसंगी धरीं तूं शांतता अंगीं ॥ नको रंगूं विषयरंगीं रती बा ठेव सत्संगीं ॥ ॥ ३ ॥ सदा राहे विचारानें मना ब्रह्मीं महाज्ञानें ॥ जगीं वर्णास रे चारीं मना लावीं सदाचारीं ॥ ४ ॥

पद. ( चाल—सखे अशी ध० )

अझोनि भीति नाहीं गेल्हिो मनांतुनी ॥ कितीक घाटि मुंबईस जाति सोडुनी ॥ तसेच मारवाडि जाति फार भीऊनी ॥ स्वदेशिं राहण्यास सर्व द्रव्य घेउनी ॥

ठुंबरी.

निदि आनि आवे कारे बादराड रावे मैको ॥ निदि० ॥ कारिरे कोयलीये बन बिच बोले ॥ पापीरे पयैया पीहुपी डरावे मैको ॥ निदि आनि० ॥ १ ॥

पद.

हे मन रत रविकुलवरभजनीं तूं व्हावें सुख तुज जरी ॥ धृ० ॥ सुविमला पदकमलयुगुला ध्याईं आत्मारामाच्या त्या सदा तूं ॥ तदितर मृगजलचि सगळें पसरत जगभरीं ॥ हे मन० ॥ ॥ १ ॥ तिमिर रवि जसें सकल अघ हरी मुद भरी मनीं सुविमल ॥ २ ॥

पद. ( चाल—मेरे गमका तू० )

कुणि कृपा करा मज प्राणपती मम दावुन जोडीं हात, त्याविण पळ मज युगसम भासे स्वास्थ्य न चित्ता होत ॥ भागिरथी शिरिं वास करी शशि विलसे तैसा त्यांत, नागीं वेष्टित सुतनु ज्यांची दावा तो मज नाथ हो ॥ १ ॥ कोपुनि मजवरि वनवासीं हो गेला मार्गें याच, त्रिपुरासुर रिपु दावा मज तो शिव मी जोडीं हात ॥ २ ॥ दया करा न शंभो मज मळवा,

सतिवरी न होवो जुलुम भवा ॥ तुह्मीं भवानी त्यागुनि कां आलां, ती कलहें करि शीण ॥ न शंभो म० ॥

ठुंबरी.

अंगुलीमें काटा लगावे दरदी बालम ॥ बेद बुलावूं नाड दिखलावूं ॥ डरकें मारेतो मरजावूंगी ॥ मो० ॥ १ ॥

साकी.

अवश्य जे कां भाळीं लिहिलें तें न कधींही चुकतें ॥ कर्मपरार्थक ग्रंथ रचुनी तुषाग्नि गृह का करिते ॥ ह्मणुनी स्वस्थ रहा ॥ विधिलेखन तें घडविं पहा ॥

पद. ( चाल--गजानना दे दर्शन० )

ज्यावरि मीं विश्वास ठेविला ॥ समजे प्राणप्रिय जो मजला ॥ भजलों देवा परि मी ज्याला ॥ तो ऐसा फिरला ॥ ध्रु० ॥ योग्य मी नव्हतों तद्रागनीला ॥ द्यावी होती अन्य नृपाला ॥ कैसा मम वैरी सन्मानीला ॥ हें दुःखद मजला ॥ ज्यावरि०

पद.

निजसुखरत पुरुष सदा स्त्रीस गांजिती ॥ आळ तिचा सान तरी ते न पुरविती॥ ध्रु० ॥ गरज तयां जयिं असते, प्रेमें तिज हटकिति ते ॥ गरज सरो वैद्य मरो, करिति असें वर्तन ते ॥ अबला परि प्रेम सदा पूर्ण राखिती ॥ नि० ॥

पद.

सदाशिव शंभु सदा भज भोला ॥ ध्रु० ॥ चरणसरोजीं विनत शिवाच्या ॥ तो नर मुक्तिस जाय सदा ॥ सदा० ॥ हर हर हर हर सांब सदाशिव ॥ ध्यासचि लागो मनासि सदा ॥ सदाशि० ॥

पद. ( चाल--कांरे हरी तूं मज छळिसीं० )

रमा करी मम मनिं क्रीडा ॥ करिते चेष्टा परि काय करूं अतिशय होते मज पीडा ॥ ध्रु० ॥ अर्पियलें मी सुमुखी सुगुणी । योषिते । स्वमनास । धनास । तनूस । जिवासहि ।

23 3540

खास । मिथ्या नच सुमती हा खचित तव वचनीं राहिल मनकवडा ॥ १ ॥

पद. ( कर्नाटकी नाट्य राग ताल धमाळी. )

वदनीं घर्मजलाला ॥ पुसुनि पुसुनि कर शिणला ॥ श्वासभरित उर झाला ॥ ये रक्तपणा गालाला ॥

पद. ( चाल वैशाख मा० )

अबलांनो संसारा नीट चालवा ॥ पतिसौख्यीं झटत असा नित्य समजवा ॥ धृ०॥ तुमच्या परी पुरुषांची बुद्धि होतसे ॥ जरी कष्टें वदुन वित्त त्यांसी मिळतसे ॥ गृहकृत्यीं सत्य कधीं वारें त्यां नसे ॥ शिक्षण तें मिळवुनियां वेंड घालवा ॥ ॥ अबलां० ॥ २

पद. ( चाल—सखे अशी ध० )

पूर्ण करा सकल हेतु मदीय सुंदरा ॥ धरी करा संग सुखें सुखवि ईश्वरा ॥ धृ० ॥ विघ्ननगा भग्न करा अहो गुणाकरा ॥ चित्त माझें शांतविण्या प्रेम मनिं धरा ॥ सौख्यतरु फलद्रूप पूर्ण तो करा ॥ फलस्वाद घेउंद्या सगुण मंदिरा ॥

पद. ( चाल—आजि झाला हा क० )

अवचित कैसा हा मजवर घाला पडला ॥ जन्माचा होउनी काला ॥ धृ० ॥ अर्पुनि राजकुलीं तात मनीं बहु धाला ॥ परि शेवट गोड न झाला ॥ सोसूं कशी मी दुस्तर प्रतिबंधाला ॥ सुटकेचा मार्ग न उरला ॥ चाल ॥ ईश्वरा देई मज थारा तूं तरी ॥ शरण मी जाऊं तरी कोणा श्रीहरी ॥ तुजविना कोण मज तारी सत्वरी ॥ ऐसी नीच दशा येऊं नये कोणाला ॥ त्यांतहि स्त्री समूहाला ॥ अवचित कैसा० ॥ १ ॥

साकी.

अग्निहोत्र भस्मानें दरडी पाहा ह्या शुभ्र जहाल्या ॥ होम धूम्र सुवासें कैशा दहाही दिशा घुमघुमल्या ॥ पूर्ण मीमांसेचा ॥ होवो वर्षावचि साचा ॥ १ ॥

पद. ( राग कानडा–ताल त्रिवट. )

सुवर्ण केतकिपरि जो दिसतो वर्ण नव्हे तो दुसरीचा ॥ सड-पातळ नाजुक हा बांधा खचित त्याच मृदु देहाचा ॥ पदतल बघतां भास होतसे नूतन संध्यारागाचा ॥ कांचिमुळें ओळ-खतां येतो असुक देश ह्मणुनी कटिचा ॥ निर्मूनि जीला कळ-सचि झाला धात्याच्या चातुर्याचा ॥ तेंचि असावें रत्न असा ग्रह झाला इस पाहुनि मतिचा ॥ १ ॥

पद. ( चाल–अस्तमान झाला, टाकुनि युद्ध राम आला० )

बघुनि सुभद्रेला ॥ कसा यति वेडावुनि गेला ॥ धृ० ॥ चाल ॥ हस्तांतिल ती गोमुखि गळली ॥ आशीर्वचनीं जिव्हा चळली॥ नासिकाग्र दृष्टि ही वळली ॥ चाल ॥ निर्लज्जचि झाला ॥ टकमक मुख तें बघण्याला ॥ बघुनि० ॥ १ ॥

पद. ( चाल–सुने दिलदार गुल. )

अनंगाच्या शरें भिउनी मना विमला ॥ शरण जासी त्यजु-नि मजसी तया अबला ॥ धृ० ॥ तुझें रक्षण करें माझ्या कसें व्हावें ॥ असें मी नाथविरहित ही अशि अबला ॥ परि तुजला कशि न वाटे लाज याची ॥ धरुनि शांती मिळवीं अंतीं सुसौख्याला ॥ २ ॥

ठुंबरी.

लंगर मोरी गागर पटक गयोरी ॥ टेक ॥ ठाढ़ी पन घटवा नवल नन्द नटवा झमक झट अचरा उलट गयोरी । कीनी रसब तियां छिलिनी मोरी छतियां छैल गहि बैयां झटक गयोरी ॥

ठुंबरी.

बैयां मेरी झटक मटुकि मेरी पटक कुंजन गयो सटक मुकुट धारी हो ॥ टेक ॥ आली कैसी करोंरी मानत नाहीं री बरजत हो ॥ नित ही ॥ छबीलो छल हेरो रसीलो रस घेरो हंस हेरो मानो जादू डारी ॥

गजल. ( मै दोहा. )

गमे दूरिसे जी जलता है अशक आंखोंसे जारी है ॥ तपिश है रंज है गम है अलम है बेकरारी है ॥ सजन सकारे जयगें नैन मरेगा रोय बिधना ऐसी रैनें करेकी मोर कभी न होय ॥ सजनसे मिलजावै सजनसे मिलजावी यही विनती हमारी है ॥ [ दोहा ] लकडी जल कोइका भई, की कोइला जल भय राख ॥ मैं पापिन ऐसी जली, की कोइला भई न राख ॥ जिगर तो जल गया प्यारे मगर अब तन की बारी है ॥

ठुंबरी.( ऐजन )

नैहरमें दाग लगल मोरी चुनरी, नैहरमें दाग ॥ चुनरी पहि-नके ससुरारीमें गइलों ॥ ससुरारी के लोग कहैं बडि फुहरी॥ नैहरमें दाग । नहिं घर धोबी नहीं घर साबुन ॥ कौने सुरति-यासे होजाय उजरी ॥ नैहरमें दाग लगल मोरी चुनरी ॥

पद. ( चाल—काय मला भूल पडलि. )

सांग सांग सावध तूं जननि होउनी ॥ छळियेलें कोणि तुला आजि येउनी ॥ धृ० ॥ असेल तो आप्त मित्र आमुचा जरी ॥ नको नको त्याचि धरूं भीड अंतरीं ॥ पारिपत्य करूनि येतों त्याचें लौकरी ॥ परि मजसीं बोल जरा मौन सोडुनी ॥ सां०

पद. ( चाल—युवराज शिवाजीस सुखी. )

मज नाहिं गडे सौख्य घरीं राहिलें जरा ॥ त्याहुनियां नि-र्जनवनिं वास तो बरा ॥ धृ० ॥ घेउनि हें पात्र, हीच माळ, वल्कलें ॥ स्नान पान साधिन गे नित्य या जलें ॥ प्रिय चिं-तनिं झिजविन मी शरिर आपुलें ॥ ध्यान भजनिं सुप्रसन्न करिन शंकरा ॥ १ ॥

पद. ( चाल—स्फटिकाचे ते पद पथ सुंदर )

बघतें बहु जरि या रति रमणा ॥ शांति नको तरी येया नयना ॥ धृ० ॥ पुनः पुनः बघतें मनहरणा ॥ तरि येथुनि

मम पद उचलेना ॥ काय करूं मज कांहिं सुचेना ॥ जाण्या-लाही मार्ग दिसेना ॥ बघतें० ॥

पद. ( चाल—सुखोपभोगा योग्य नससि तूं. )

जिंकियलें ह्या चंद्रप्रभेसी ॥ तव मुख चंद्रानें ॥ तेजरहित ही कमलें दिसती कैशीं बघ त्यानें ॥ धृ० ॥ तव दासींच्या मोहक मंजुळ गायन श्रवणानें ॥ मुकुलित कमलें खालीं घालिती माना म्लानपणें ॥ १ ॥

ठुंबरी.

सजनवां होइगा बैरी हमार । कागज हेइ सबै कोई बांचै करमवां कोई न बांचै हमार । नैया होई सबै कोई खेबै उमरिया कोईन खेबन हार ॥

ठुंबरी.

सैया निर मोहिया गहीलो मोरी बैयां कंगन मेरो करसो सरक गयोरे ॥टेक॥ राज दुलारे हो सुन पिया प्यारे हो तुम मत छांडो पिति । मैं जान नहीं दूंगी जोबन रस लूंगी कमर पतरीसी लचक गयोरी ॥

पद. ( चाल—वीरशिरोमणी सकल धनुर्धर० )

बहु मानानें प्रीति तिच्याशीं वाढविली निशिदिनीं ॥ राहिलों प्रेमें बहु रंगुनी ॥ धृ० ॥ आजवरी म्यां असें न केलें कपट कधीं ह्मणउनी ॥ जाहली प्रिया तप्त निजमनीं ॥ चाल ॥ ही माझी पाहुनि करणी ती प्रियशिला ॥ त्यागील भासतें प्राण खचित आपुला ॥ अत्यंत प्रीतिचा परि नामच हा भला ॥ विमल प्रेम भी तोडुनियां बद्धता झालों धनी ॥ राहिलों जो प्रेमें रंगुनी ॥ १ ॥

( ठुंबरी एजन. )

हे मोरे राजा झोपड वापर राजी, हे मोरे सैयां ॥ येक महला दो महला छोड केरे । हे मोरे राजा० ॥ झीन वांचादर छोड केरे ॥ हे मोरे राजा पतुरिया पर राजी ॥

( ठुंबरी–औरत. )

तोरेसि पहिया पर मोर जीया बसगये, मोर जीया बल गये तोरे सिपहियापर मोर, घोडा पर बस गये हाथीपर बसगये । झुलनी गढ़ वैयापर मोर जीया बसगये ॥ तोरेसि पहियापर॥

( बंजारा. )

छोडो बस्ती पकड़ो जंगल आवो चलो वीरानेमें । दुनया का मोह लोभ सब त्याग करदोजी ॥ कर्म रेख मीटै नहीं करै लाखों चतुराईजी ॥ छो० ॥ मा बाप भाइ बहीन यह लोग काम न आवेंगे जी ॥ रुपये के सब लोग बसत हैं नाहक जन्म सतानाजी ॥ छोड़ो बस्ती पकड़ो जंगल० ॥

पद. ( चाल–इस तन धनकी को० )

पहिलीच गवळण बसली न्हायाला ॥ अवचीत मुरलीचा नाद ऐकिला ॥ १ ॥ हें रे काय कृष्णा लंपट झालें ॥ मुरलीच्या नादानें धांऊनि आलें ॥ हें रे का० ॥ ध्रु० ॥ दुसरी गवळण उभी आंगणीं ॥ हातीं घेऊनि आरसा फणी ॥ पांच पदरांची गुंफित वेणी ॥ मुरलीनादें सर्व विसरुन गेलें ॥ हें रे का० ॥ २ ॥ तिसरी गवळण होती वेल्हाळा ॥ पाजित होती आपुल्या बाळा ॥ आंगडें टोपडें दंडाच्या वेळा ॥ पिंपळपान डोकीं बांधिलें ॥ हें रे का० ॥ ३ ॥ चवथी गवळण होती शयनीं ॥ पती आणि आपण बसलीं रितीनीं ॥ पक्या पानाचे विडे देत करुनी ॥ मुरलीच्या नादानें शयन सोडिलें ॥ हें रे का० ॥ ४ ॥ पांचवी गवळण राधा सुंदरी ॥ चल येतें आतां तुझ्या बरोबरी ॥ तुजविण सुख मज नाहीं संसारीं ॥ मुरलीच्या लोभें सर्व त्यागिलें ॥ हें रे का० ॥ ५ ॥

साकी.

मदनाग्नीच्या संतापानें शुष्क असे झालेले ॥ तिच्या स्तनाचें मंडलसम व्रण दिसती इथें उठलेले ॥ स्तन विस्तार तिचा ॥ दाविति जणुं हे मज साचा ॥

पद. ( चाल–आज अक्रूर हा० )

आजि झाला हा कळसचि दुर्भाग्याचा ॥ मज होय विघड पतीचा ॥ दिसे मावळला सूर्य सुखाचा साचा ॥ हा योग दैवगतीचा ॥ कां न द्रवला लिहितां कर निष्ठुर विधिचा ॥ असा लेख मम भाळींचा ॥ चाल ॥ या संकटीं सोडुनि आपणा ॥ कशी जाऊं या द्विजसदना ॥ कोंवे दुर्धर दैविक रचना ॥ अजुनि अंत न ये कां माझ्या जीविताचा ॥ हा काय काय कामाचा ॥ १ ॥

पद. ( चाल–कोण येतो तो० )

पुढति येई वल्गना कां करिसि लांबोनी ॥ नससि जननि दिससि नयना खचित डाकिणी ॥ मारुनी तुज टाकिते बघ मंत्र घालोनी ॥ थू तुझ्या या आग लागो वाणिला सुजनीं ॥

पद.

वसंत चरणीं प्रेमपत्रिका अर्पण करिते प्रेमानें ॥ पंकीं रुतली अबला धेनू सोडवा तिला धैर्यानें ॥ आजवरी मी दिवस कंठिले धीर धरोनी कष्टानें ॥ दीन दासिला कोणि न वाली झुरतें निशिदिनीं दुःखानें ॥ सूज्ञ वसंता चंद्रिकेस या पदरीं घ्यावी विदित मनें ॥ चरणीं विनती न केली सखया धनलोभाच्या आशेनें ॥

पद. ( चाल–कमल नयन कमल व० )

सकल जनन, विफल ह्मणुनि, विकल होय हा काय ॥ न सुचे कांहीं उपाय, न रुचे जीवन हाय, विकल० ॥ हाय हाय हाय हाय ॥ सकल० ॥ धृ० ॥ अहा विधात्या निर्मुनि अंतीं दुःखांत लोटिसी ॥ न सुचे कांहीं उपाय । न रुचे० ॥ सक० ॥ परवशतेची तिखट सुरि ही झोंबे बहु हृदयास ॥ सौख्य लेश तिळही नसे मजसी जगतीं खास ॥ न सुचे कांहीं उपाय ॥ सक० ॥

पद. ( चाल—लग्नाला जातों० )

धांव धांव धांव आतां शीघ्र माधवा ॥ तुजवांचून साह्य नसे कोणी ह्या जीवा ॥ धृ० ॥ आली कशी झोंप हरी । दुःशासन धरुनि निरी ॥ नग्न मला पाहूं करी ॥ राखि लाज येउनि तरी । अंत नको पाहूं माझा रुक्मिणीधवा ॥ १ ॥

गाणें. वटसावित्रीचें ( चाल—मज बहुतचि० )

वट सावित्री व्रत सखये ऐकावें ॥ सौभाग्य सदा जोडावें ॥ ॥ धृ० ॥ होता उदार गे भूप मद्र देशाला ॥ धरि अश्वपति नामाला ॥ पुत्रास्तव नृपती आचरी घोर तपाला ॥ करि प्रसन्न सावित्रीला ॥ देवी वदे राजा तुझिया अदृष्टाला ॥ नाहीं सुतसुख बघण्याला ॥ चाल ॥ परि होईल कन्या तुजला रे ॥ परि० ॥ जी पतिव्रता जनीं सुशिला रे ॥ जी० ॥ गातील जिच्या कीर्तिला रे ॥ गाती० ॥ चाल ॥ देवी वदुनि असें अंतर्धानचि पावे ॥ सौभाग्य० ॥ १ ॥ मग रायाची राणी धरी गर्भास ॥ भरतां भे तीस नऊ मास ॥ प्रसवे शुभ दिवशीं कन्या चिद्रत्नास ॥ सावित्री ठेवि नामास ॥ उमा रमा यांचीं उपमा साजे तीस ॥ होय थोर दिवसें दिवस ॥ चाल ॥ वर शोधा धांवे भूप ॥ परि मिळे न तिच्या अनुरूप ॥ मग तिजला देउनि हुरूप ॥ बोले योग्य तुझ्या पुरुष रत्न आणावें ॥ ॥ सौभाग्य० ॥ २ ॥ छपन्न देशाशी अश्वपतीची कन्या ॥ जाई सवें दळ घेउनियां ॥ द्युमत्सेनाचा सुत वरसा पाहुनियां ॥ येई ग्रामासी परतुनियां ॥ सर्वहि वृत्त सखे सांगतसे जों पितया ॥ येई नारदमुनि त्या ठायां ॥चाल॥ नृप मुखें वृत्त ऐकुनी ॥ वदले मुनि सखेद वचनीं ॥ अंध श्वशुर दिसेना नयनीं ॥ ॥ चाल ॥ नृप हरवुनि राज्य जयें निबिड वना सेवावें ॥ ॥ सौभाग्य० ॥ ३ ॥ वृक्षातळीं निजती कंद मुळें सेवुनी ॥ पहावे न आपदा नयनीं ॥ ऐकुनि भूप ह्मणे वर दुसरा पाहुनी ॥ द्यावें मुनि हिजला लग्नीं ॥ बोले सावित्री प्राण जाई जरि

निघुनी ॥अन्यास वरीं मी न मनीं॥चाल ॥व्यभिचार धडधडीत घडतो॥पातिव्रत्य धर्मही बुडतो॥लल्लाट लेख नच चुकतो॥चाल॥ परि निश्चय ध्रुवा कधिं नसखे ढळवावें ॥ सौभाग्य० ॥ ४ ॥ मुनि नारद बोले विचार कर मनिं पुरता ॥ कां ओढुन घेशी अनर्था ॥ आजपासुन एक संवत्सर होईल सत्यवानांता ॥ मग करशील तूं काय सांग मज आतां ॥ पती मृत्यु मुखांतचि पडतां ॥ चाल ॥ मुनिलागीं वदे सावित्री ॥ असलें जरी सुकृत पदरीं ॥ ग्रह रक्षिल तो निर्धारीं ॥ चाल ॥ देईन पतिसंगें प्राण गमे मज बरवें ॥ सौभाग्य० ॥ ५ ॥ सुमुहूर्तीं मग सखये लग्न उभयतां झालें ॥ चारहि दिवस सोहाळे केले॥ ॥ अश्वपती रायें कन्येसी ठेवियलें ॥ पतिसंगें वनीं त्या वेळे ॥ चाल ॥ पतिपद सेवी दिनरात्री ॥ तप खडतर करी सावित्री ॥ चाल ॥ स्त्रियांस पतिविण गे दैवत अन्य नसावें ॥ सौभाग्य० ॥ ६ ॥ वृद्ध रोगी अथवा दरिद्री पती जरी झाला ॥ जोडीत नसे द्रव्याला ॥ तरी नच कंटाळे पतिव्रता कधीं त्याला ॥ बोलेना कटु शब्दाला ॥ चाल ॥ पर पुरुष वदन नच पाही ॥ नवऱ्याचे वचनीं राही ॥ भावीं पुण्य तरी अशी सुलक्षण पावे ॥ सौभा० ॥ ७ ॥ सांगे नारद तो दिन गे जवळी आला ॥ परि निर्भय सती चित्ताला ॥ चवथे दिवशीं जो मृत्यु सत्यवानाला ॥ असे उपास सावित्रीला ॥ ॥ चाल ॥ फळ मूळ पाणीही घेना ॥ अंध श्वशुर बोले वचना ॥ चाल ॥ कां उपवास गडे इतुके घोर करावे ॥ सौभाग्य० ॥ ८ ॥ मृत्यु दिवस पतिचा जरी तो आला जवळी ॥ नच सांगे कुणा वेल्हाळी ॥ सत्यवान निघे उठुनी प्रातःकाळीं ॥ जावयास रानोमाळीं ॥ चाल ॥ लागे सावित्री वाराया ॥ परी निघे फळें आणाया ॥ त्यासह मग सतिनें केंवि गडे नच जावें ॥ सौभा० ॥ ९ ॥ पर्यटण करितां अस्त पावला हेली ॥ रात्र ग भयंकर पडली ॥ सावित्री वि-

नवी पती जाऊं आश्रमा जवळी ॥ पहा वेळ किती तरी झाली ॥ चाल ॥ तो वटवृक्षीं उभा राहुनी ॥ टाकी शुष्क काष्ठें मोडूनी ॥ चाल ॥ त्यांतिल एक न कां शिरीं त्याचे आदळावें ॥ सौभाग्य० ॥ १० ॥ वर्मी लांकुड तें मस्तकांत आदळतां ॥ पडे सत्यवान भूवरता ॥ आली धांवुनियां जवळी त्याचि कांता ॥ उदकासी घाली मुखीं, माथां ॥ चाल ॥ बोले प्राणपती लवकर आजि उठावें ॥ सौभाग्य० ॥ ११ ॥ अंध पिता माता अशक्त ऐकुनि वार्ता ॥ खचित ते करिती प्राणांता ॥ पोटीं घालावे मम अन्याया बहुता ॥ गमेना चित्त नच जरि करितां ॥ चाल ॥ कां गेलां नाथा दूरी ॥ करी शोक असा बहु सुंदरी ॥ चाल ॥ लिंग देह न्याया ये यम त्या पाठीं धांवे ॥ सौभाग्य० ॥ १२ ॥ करुनि स्तवन मुखें घाली लोटांगण ॥ वदे महाराजा तूं कोण ॥ येरु वदे यम मी पतिव्रता तूं ह्मणून ॥ दीधले न दूत धाडून ॥ चाल ॥ तव ऋणानुबंध तो सरला ॥ करीं जा दहन पतीप्रेताला ॥ येरी ह्मणे आतां तव पद कोणी सोडावें ॥ सौभा० ॥ १३ ॥ पति प्राणा संगें मजसीं समर्था नेई ॥ मी तुझी कन्यका पाहीं ॥ अशी वैधव्य दशा देऊं नको तिस कांहीं ॥ जामाता आपुल्या उठवीं ॥ चाल ॥ यम बोले न घडे सहसा ॥ पति वांचुन मागें वरसा ॥ प्रसन्न मी तुजसीं वचन गडे बोलावें ॥ ॥ सौ० ॥ १४ ॥ बोले सावित्री नयन श्वशुरा देई ॥ यम वदे तथास्तु बाई ॥ त्वत्कर स्पर्शातें येतिल मागें जाई ॥ मग वदे सती लवलाहीं ॥ चाल ॥ तुज ऐसा सांडुन जनिता ॥ मी जावें कोणीकडे ताता ॥ आपणा समागमें मज माहेरा न्यावें ॥ सौभा० ॥ १५ ॥ वंदन साधूसी, असलें जरी मन पतीचरणीं ॥ ने दयाघनचि होऊनी ॥ बोले यमराजा पती जीव वेगळा करुनी ॥ गडे माग कांहीं दुसऱ्यांनीं ॥ चाल ॥ दे राज्य परत श्वशुराशी ॥ यम बोले तथास्तु तिजसी ॥

दिधल्या वरदानें सौख्य भोगीं गृहीं जावें ॥ सौभाग्य० ॥ ॥ १६ ॥ बोले सावित्री होईं दयाळू ताता ॥ पतिसंगें मज ने आतां ॥ पूर्वीहून करीं ह्या व्रत तप असेल घडलें ॥ मातृ-पिता श्रीहरि मानिलें ॥ चाल ॥ जरी अनाथ प्रेत दह॰ नासी ॥ किंवा दरिद्रियाच्या लग्नासी ॥ चाल ॥ गुरु सेवना- दिकें दयेसी तुज आणावें ॥ सौभाग्य० ॥ १७ ॥ मग तो बोले इच्छा तव वद सयमिनी ॥ सत्यवान वेगळा करुनी ॥ ह्मणे ती शत सुत दे मत्पितया लागुनी ॥ यम वदे तथास्तु सजणी ॥ चाल ॥ तुझी भीड फार गे बाई ॥ ह्मणुनि वर इतुके देईं ॥ चाल ॥ सत्वर जाउनियां अग्नि पतीला द्यावें ॥ ॥ सौभाग्य० ॥ १८ ॥ बोले सावित्री दुष्काळा मधीं अन्न ॥ तृषार्ता उष्णि जलपान ॥ असेल जरी केलें दुर्बळ क्षीण रक्ष॰ ण ॥ पूजिले हरिरुपी ब्राह्मण ॥ चाल ॥ जरी अभेदी ग हर हरिसी ॥ असती गडे भजलें त्यासी ॥ चाल ॥ तरि मज सू- र्यसुतें बघुनि दयाळू व्हावें ॥ सौभाग्य० ॥ १९ ॥ श्राद्धदेव मग तो बोले मनीं हांसोनी ॥ घे चतुर्थ वर मागोनी ॥ वदे सती शब्द नको वंध्या मजलागुनी ॥ मांगली वदवि जन वदनीं ॥ चाल ॥ तरुवर फळांविण जाण ॥ कीं सदन वेद- घोषावीण ॥ तरी सुत नसुनी कसें वंश पवित्रचि व्हावें ॥ सौभाग्य० ॥ २० ॥ तुज सांगाते पंथ क्रमिला आतां ॥ आहे सौभाग्य सरिता ॥ ह्मणुनि रित्या हातीं यम राजा सर्वथा ॥ दवडूं नको मजला ताता ॥ चाल ॥ तंव होउनियां तो द- याळ ॥ वदे तुजला दिधलें सकळ ॥ चाल ॥ संतुष्टचि झालों कन्ये मी सर्वस्वें ॥ सौभाग्य० ॥ २१ ॥ बोले सावित्री तूं सर्वज्ञचि मूर्ती ॥ सत्यवाना आयुष्य किती ॥ येरू ह्मणे अ- ससी ममकन्या निश्चितीं ॥ विख्यात जगीं तूंचि सती ॥ ॥ चाल ॥ चौशत वर्षें पर्यंत ॥ त्वत्पति हो आयुवंत ॥ ॥ चाल ॥ शत सुत तुजलागीं बहुत पौत्र ही व्हावे ॥

॥ सौभाग्य० ॥ २२ ॥ सकळ हि तव वैरी पावतील गे आतां येईल राज्य ही हाता ॥ कन्ये जाउनियां पतिपाशीं तूं आतां॥ येईल प्राण स्पर्शीतां ॥ चाल ॥ मग तो पावे अंतर्धान॥ आनंद सती लागून ॥ चाल ॥ पतिहनु धरुनि वदे नाथा जाग्रत व्हावें ॥ सौभाग्य० ॥ २३ ॥ तंव तो गडबडुनी सत्यवान वर उठुनी ॥ आलिंगी सति लागूनी ॥ बोले खावीं फळें परी नाकारीं सजणी ॥ सासु श्वशुरा वांचूनी ॥ चाल ॥ ये भाग्य दरिद्रचि सरतां ॥ स्वर्गस्थ तशा सुरकांता ॥ ॥ चाल ॥ सती दर्शनें घ्याया त्यांनीं कसें नच यावें ॥ ॥ सौभाग्य० ॥ २४ ॥ पृथ्वी वरील तशा मिळुनि सर्व कामिनी ॥ येती पूजा करीं घेऊनी ॥ पूजिती सती पतितें वट तरुतळीं येऊनी ॥ सौभाग्य द्रव्य अर्पूनी ॥ चाल ॥ वटतरुसी करिती प्रदक्षिण ॥ वट सावित्री तैं पासून ॥ चाल ॥ पूजिती सकल स्त्रिया आनंदें आज पावें ॥ सौ० ॥ २५ ॥ गर्वें न पुजुनी ज्या वनिता तैशा रहाती ॥ दर जन्मीं विधवा होती ॥ यावरी सावित्री धरुनि भ्रतारा हातीं ॥ जातीं निज आश्रमपंथीं ॥ चाल ॥ वदे पद केशांनीं झाडीन ॥ चरणीं रुतती कंटक पाषाण ॥ चाल ॥ नाथा सकुमारा पतिवर्या हळुच चलावें ॥ सौभाग्य० ॥ २६ ॥ इकडे गृहीं सखये सुत-सून हरपली ह्मणून ॥ वृद्धें तीं करिती रुदन ॥ जों अवचित तीं राहती उभीं येऊन ॥ सतीस्पर्शें उघडी नयन ॥ ॥ चाल ॥ झाला एकचि ब्रह्मानंद ॥ नभीं बघती निर्जर वृंद ॥ सति कीर्तिसी अशा सतत सज्जनीं गावें ॥ सौ० ॥ ॥ २७ ॥ हें चरित्र नर-नारी श्रवण प्रेमें करिती ॥ दीर्घायुषि सत्यच होती ॥ कीर्ति मिलिंद हा जनभ्रमरचि सेविती ॥ सौभाग्य स्त्रिया जोडिती ॥ चाल ॥ श्रीरंग भगिनी ऐसी ॥ सावित्री कथनासी ॥ चाल ॥ तुकाराम गणपती बोले श्रवण करावें ॥ सौभाग्य० ॥ २८ ॥

पद. ( चाल–कां रे हरी तूं मज छळिसी. )

मदन दहन करि तनु मम ही ॥ विरहभार हा हृदयीं न धरवे त्राण न उरलें या देहीं ॥ धृ० ॥ निघुनि चालले पंच प्राण हे ॥ काय करूं किति धीर धरूं कवणास स्मरूं ॥ न सुचे कांहीं ॥ मदन द० ॥ १ ॥

टिपरी.

धीना धीनक धीनाधीन ॥ धीना धीनक धीना धीन ॥ ॥ धृ० ॥ पुनरपी घेउनि गोपी हरी ॥ रासानंदे क्रीडा करी ॥ काय वर्णू या सुखासी ॥ रास खेळतो कृष्णासीं ॥ आनंद झाला मानसीं ॥ हरि कृपेनें सर्वांसी ॥ साहा महिन्याची रात्र करी ॥ गोपी हेलूनें मुरारी ॥ सुगंध द्रव्यें अपरमित्त ॥ गुलाल गोपी उडवीत ॥ धीना धीनक धीना धीन ॥ धीना धीनक धीना धीन ॥ १ ॥

ठुंबरी. ( राग–पिलु–जिल्हा ताल त्रिवट. )

बै रनियो लगरही आखरे ॥ चलत पवन सो रही आंगना ॥ धृ० ॥ सोतीथी मैं निंदके मारे क्या महेलमे सो रहे ॥ गजरा गजरा काहा करे तोरा गजरा ले गयो चोररे ॥ चलत पवनसो रहि आंगना ॥ १ ॥

होरी. ( राग–काफी–ताल पंजाबी )

देती मै राम दुवैया छेला जीना रंग डार दिया है ॥ धृ० ॥ एक मेर मोहे सब रंग छिर कोहत मेरी राम रखैया छेला जीन रंग हार दिया है ॥

ठुंबरी. ( राग–काफि–ग० पंजाबी. )

सखिरि मै ठट पानिया कैसे ज्यावुरी ॥ सखि नटनागर और मुगुट बारो करत ठाठोली बनूसी बट जमुना ॥ अंतरा ॥ कुचक बुचक ज्या देत अखतर ठठपण घट बनूसी बट जमुना ॥ १ ॥

ठुंबरी. ( चाल–कोन गली गयो श्याम )

भीति मनीं वाटे । प्रियकरा भी० ॥ धृ० ॥ परिसुनियां ही तुमची वाणी ॥ तनुसि कंप सुटे ॥ प्रियकरा भी० ॥ १ ॥

पद.

भज जीवा भज शंकर जीवा, सत्य नव्हे संसार मानवा ॥ ॥ ध्रु० ॥ माझें हें तें माझें ह्मणसी, कोण परी तूं कोठून येशी ॥ भज० ॥ १ ॥ जाणें कोठें काम काय तुज, विचार हा कां करिशि न जीवा ॥ २ ॥ वस्तुमात्र तो एक नटे शिव, अद्वय अव्यय निर्गुण गावा ॥ ३ ॥

ठुंबरी.

प्रीत लगरवा छत्र छबिलरवा तू नारीरे ॥ बैन बजावत गावत नाचत है गत थारीरे ॥ करज फिरज मोरी बयां मरोरीरे ॥ मोतियनकी लड तोरीरे ॥ प्रीतलगरवा० ॥

पद. ( चाल—अंजनपर्वा न करी )

चांडाळाला जाउनि सत्वर बंधन करुनि मजपुढती ॥ आणा झडकरीं न धरीं शंका द्यावी शिक्षा देहांतीं ॥ क्रोधानें मज अंध करोनी कांहीं सुचेना या पुढती ॥ व्याघ्रदरीची आशा कैसी जंबुक करितो मूढमती ॥ नीचाला ही शिक्षा द्यावी जिवंत कडक अती ॥ ह्मणुनी सांगतों स्पष्ट तुह्मांला दया न करी यावरती ॥

लावणी.

हरिची भगिनी ह्मणे सुभद्रा रुक्मिणीवहिनी दया करा ॥ दादाला तुह्मीं कळवुनि वळवुनि अर्जुनजीचा शोध करा ॥ ॥ ध्रु० ॥ आइबापाचा श्रीकृष्णाचा विचार मोडुनी बळदेवें ॥ दुराग्रहानें निश्चय केला सुयोधनाला मज द्यावें ॥ भाउ नव्हे हा बाउच केवळ भाउनि मनांत उमजावें ॥ वडिल बंधु परि अडिल खोडकर खळाकडिल हें समजावें ॥ हंसा टाकुनि काय वायसा मुक्ताफळ हें अर्पावें ॥ ब्राह्मण ढकलुनि चांडाळाला काय ह्मणुनियां जेऊंद्यावें ॥ जन्मांतरिंचा वैरी भाऊ असें यावरून वळखावें ॥ अपाय याला उपाय न सुचे काय मरावें विष खावें ॥ दुर्योधन खळ हेला मेला गेला उलथुन

पोटभरा ॥ दा० ॥ १ ॥ भावोजीचा निरोप घेउन गेला तीर्था हिंडफिरा ॥ कोण्या जागीं नकळे आहे जागा किंवा नीदसुरा ॥ तडी तापडी किंवा कापडी होउनि गेला काशि-पुरा ॥ आवडिनें कीं कावडी नेल्या सेतुबंध रामेश्वरा ॥ गंगा यमुना तापी तुंगा कृष्णा रेवा हरिद्वारा ॥ यांच्या पुलिनीं म्य साधुंच्या मंडळीमध्यें असेल खरा ॥ कांटक वैकरनाटक यंकट पतिसह पाहुनी करवीरा ॥ पंढरपुर भूवैकुंठाला आला रिजन माहेरा॥ पुंडलिकानें कान फुंकिले केला चेला संतपुरा ॥ दादा० ॥ २ ॥ किंवा अमराधीशें नेलें अमरावतिला निज-कुमरा॥ तिलोत्तमा ऊर्वशी मेनिका रंभादिक ज्या सुराऽप्सरा॥ असला सुंदर ठसला असला भुलवुनि नेला त्यांणिं घरा ॥ हसला बसला घुसला जाउनि फसला तेथें खराखुरा ॥ अथवा झाला असेल साधू शोधुनि सगळी वसुंधरा ॥ प्राणाधिक जो आणा घालुनी आणावा वर पार्थहिरा ॥ अर्जुन घेउन कशास रोणा गर्जुन मज भय नाहीं जरा ॥ अर्जुन वर्जुन देह विस-र वाटे मजला मृत्यु बरा ॥ तो बैरागी तरि बैरागिण हो-जाइन दिगंतरा ॥ दा० ॥ ३ ॥ मज हररिपु हे जहर क-र करि लहर आली बाई धराधरा ॥पळपळ युगसम वाटे अनु-भव पहिला वहिनी मनीं स्मरा ॥ काल रात्रिं म्यां स्वप्न देखिलें जणों पूजित्यें गौरिहरा ॥ गौरव करुनी गौरीनें हा प्रसाद दिधला हार तुरा ॥ कौरवपतिला रौरव होइल बोले ऐसें दिव्यगिरा ॥ जाइल बाइल करुनि यति तुज वाइल कंठीं नर नौरा ॥ यती नोहे यावरुनी गमतो पति अर्जुनजी-चा चेहरा ॥ खुणा पहातां उणा नसे तिळ खुणा सगळी तुह्मीं स्मरा ॥ शुभ चिन्हें हीं देहीं सांगतों काशि कवीचा ठिक होरा ॥ दादाला० ॥ ४ ॥

सुरावर्त. ( राग भूप. )

गरेसा धप सासारी गगरी सारी ग पपगरी गपधसा धप धप

गरे गरे सागरे धृ० ॥ पधसा धप सासारे गगरे सारे ग धप धप गरे गरे साग ॥ १ ॥

पद. ( चाल—पंचतुंड नर रुंडमालधर. )

वक्रतुंड गणराज गजानन । शंकर तनया भव हरणा ॥ कार्यारंभीं स्तवितों तुजला । नमुनी आधीं प्रभुचरणा ॥ धृ० ॥ पाशांकुशधर सिंदुर भूषित । मूषकवहना सुखसदना ॥ भक्त मनोरथ पूर्ण कराया । अवतरलासी गजवदना ॥ वक्र० ॥ विघ्नेशा मम विघ्न हराया । लौकरि येईं अघशमना ॥ मत्कवनीं ह्या रंग भरोनी । सुमती देईं ह्या दीना ॥ वक्र० ॥

पद. ( चाल—मजवरती खचित )

मजवरती पूर्ण राजी परि आतां विटविलें ॥ कुटिलेनें कपट सारें हृदयासी पटविलें ॥ मरतें मी जन्मुनीयां नच कांहीं पाहिलें ॥ सवतीनें चेटुकानें नाथाला मोहिलें ॥ १ ॥

पद. ( चाल—तवमानस कैसें काय. )

नकळे नरपती हा आतां वदतो काय ॥ धृ० ॥ चिंतेनें मम काय जळतो किती हायहाय ॥ श्रीजगदंबे आई भवानी तारक तूं मजमायगे ॥ अन्य न कोणी ऐसें जाणुनी नमितें मी तव पाय ॥ होउनी दीनशी गाय ॥ नकळे० ॥ १ ॥

ठुंबरी. ( त्रिवट. )

गारी दिनि लाखन मैं मोरा सय्या ॥ धृ० ॥ कबसे खडी रही ब्रिंदाबनमो ॥ मुरलिकि धुन सुन काननमों ॥ मोरा सय्या, हाजी मोरा सय्या ॥ गारी० ॥ १ ॥

पद. ( चाल—जगीं आशेचा. )

इच्छा माझी पूर्ण करुनि मीं घेईन आतां हां हां ह्मणतां ॥ रसिका सुंदरी मदन मंजरी मिळवुनी सुखविन आपुल्या चित्ता ॥ धृ० ॥ कामसेन नृप पद भ्रष्टचि तो करितो जाउनि तेथें आतां ॥ काय पाड त्या मशकाचा निज स्थापन करितों अवघी सत्ता ॥ दुर्बुद्धि हें नांव गाजविन हरण करूनियां

त्याची कांता ॥ काय उणें मग मजला या जागीं सकल सुखाचा बनलों भोक्ता ॥ १ ॥

पद. ( चाल--आजि शेवटचा० )

तुह्मी श्रवण करा प्रभुची निज गुण कीर्ती ॥ कामना मनिंच्या पुरती ॥ धृ० ॥ हा यमुनेचा डोह भयंकर भारी ॥ तिथें वसे सर्पविखारी ॥ नामें काळिया विषय बहुत जीव मारी ॥ वर्जिलें जल व्रजनारीं ॥ तद्विषयोगें कडे सळसळां वारी ॥ त्या विघ्ना कोण निवारी ॥ चाल ॥ तिरीं एकचि कदंब हाले ॥ वरकड तरु भस्मचि झाले ॥ विष वायु मिश्रित चाले ॥ मग जिरवाया मस्ति फणीची पुरती ॥ प्रभु विचार मानसीं करिती ॥ तुह्मी० ॥ १ ॥ ही पूर्व स्मृती विसरुनि अवघे गोप ॥ संगातें घेउनि कळप ॥ गो-वत्सरें उष्णें टाकिती धाप ॥ आले कालिया डोहासमिप ॥ त्या उष्णाचा सोसेना बहु ताप ॥ प्राशिती विष मिश्रित आप ॥ चाल॥ असु रहित सर्वेही तडफडती ॥ वदवांतुनि विषजल वमती॥ हें जाणुनीयां यदुपती ॥ प्रभु सकळांच्या कृपाछत्र वरी धरिती ॥ जिववुनी संकट हरती ॥ तुह्मी० ॥ ॥ २ ॥ मग खोंवुनियां कटि वसनाची निरी ॥ प्रभु चढले कदंबावरी ॥ उडी टाकियली कालिंदीच्या तिरीं ॥ जळ उसळलें बरी अंबरीं ॥ करी आक्रोशा गोपवृंद तो तीरीं ॥ नकळे तुज कारेविहारी ॥ चाल ॥ चित्तीं बहु व्याकुळ झाले ॥ नयनांतुनि जलपुर चाले ॥ जैसे कां निर्जिव पाले ॥ त्या प्रभुसाठीं गाई वत्स हंबरती ॥ उदकांच्या भोंवती फिरती ॥ ॥ तुह्मी० ॥३ ॥ गडी येउनियां कथिती त्या यशोदेला ॥ यमुनेमध्यें कृष्ण बुडाला ॥ हें परिसुनियां करिती बहु शोकाला ॥ ह्मणतसे प्राणची गेला ॥ रेबलरामा काय करूं मी याला ॥ मजवरी हा घाला पडला ॥ चाल ॥ येउनियां यमुने तीरीं ॥ आक्रंदती त्या वज्रनारी ॥ पाहुनियां यमुने तीरीं ॥ बलराम ह्मणे हरि हा येईल वरती ॥ त्या वचना जन आदरिती ॥ तुह्मी० ॥ ४ ॥

षड् वर्षांची मूर्ति हरिची खासी ॥ ये कालिया सदनापाशीं ॥ तयीं नागिणी पद्मिनी पुसती त्यांसी ॥ तूं कोण कोठिल रहिवासी ॥ निद्रिस्त असे भ्रतार तेजोराशी ॥ उठल्यावरी प्राणची नाशी ॥ चाल ॥ दिससी तूं अति सकुमार ॥ कोणाचा अससि कुमार ॥ मग बोलत नंदकिशोर ॥ मज भीति नसे, ह्मणुनी मंदिरीं शिरती ॥ कालियास जागृत करिती ॥ तुह्मी० ॥ ५ ॥ हें पाहुनियां फोंपावत अहि आला ॥ वेढिलें श्रीरंगला॥मग भगवंतें फुगवुनियां निज तनुला ॥ मद रहितची तो अहि केला ॥ तच्छिर भागीं हरिनें निजपद दिधला ॥ करी वादन मग मुरलीला ॥ चाल ॥ मर्दुनियां भुजंगमाला ॥ शत फणींचा चूरचि केला ॥ अहि लागतसे चरणाला ॥ त्या दुष्टाचे क्रोधानळ मनीं जिरती ॥ चित्तवृत्ति हरिपदीं स्मुरती ॥ ॥ तुह्मी० ॥ ६ ॥ त्या समयासी हरि कथिती त्या अहिसी ॥ या सागरीं वास न करिशी ॥ मत्पद चिन्हें मंडित तव वपु खासी ॥ पाहुनी भय गरुडासी ॥ दे स्फुरण सदां श्रीकृष्ण तनय दासासी ॥ वर्णाया तव गुणराशी ॥ चाल ॥ दवडुनियां भुजंगमाला ॥ प्रभु सत्वर बाहेर आला ॥ मग सर्वांसि हर्षचि झाला ॥ ॥ चाल ॥ प्रभु यमुनेच्या शुद्ध जलातें करिती ॥ नर नारी उदका भरिती ॥ तुह्मी० ॥ ७ ॥

पद. ( चाल—भूपती खरे ते वैभ० )

ही जाळितसे मम सकल तनू गे चिंता ॥ करि शांत सखे हे मन्मानस अंत न बघतां ॥ ध्रु० ॥ ह्या भावि सुखाचा वृक्ष सुशोभित होता ॥ मत्समान नाहीं दैववान जगिं पहातां ॥ ॥ चाल ॥ मग बसेन शंकर अंकीं ॥ मी खरी ॥ सद्भावें पुजुनी त्यांला ॥ निज करीं ॥ प्रीतिनें आळवीन नाथा ॥ कधिं विहार ॥ ऐसा हरासवें भगवंता ॥ मज घडेल नकळे सुदिन तोच गुणवंता ॥

ठुंबरी.

ये बनसी किने बजाईरे पिया माने न मोरा ॥ ये ब० ॥ ये बनसी मोरा प्राण बसत है ॥ ये बनसी गई चोरीरे मिया माने न मोरा ॥ ये च० ॥

पद. ( ब्यांडचे चालीवर. )

पुरे पुरे सुबोब हा तु ठेवी बांधुनी ॥ पुढें तुझ्या उभा असेरे मृत्यु येउनी ॥ दया कशी येईल ऋषि वचन ऐकुनी ॥ सत्य व्हावयास पुनः जन्म घे जनीं ॥

पद. ( चाल—झगडा. )

कामशरें बहु पीडितसे मीं प्रेमभरें मज दे रतिदान ॥ शांत करिं गे छडकरी नातरी जातिल या शरिरांतुनी प्राण ॥ ॥ धृ० ॥ कर कृष्ण वदन जा इथुनी ॥ मनीं वीट येत तुज बघुनी ॥ बोलले बहुत विनवोनीं ॥ परि शुद्ध दगड तूं भुवनीं ॥ तव वदन शशी ॥ किती रमवि मशी ॥ अन्नोदक मज गोड न लागे ॥ ध्यास तुझा अवघा ह्मणुनी ॥ करी मत त्राण॥ वाहिले प्राण ॥ तुझ्या पदीं जाण॥ विनति ही मान ॥ असाध्य वस्तु साध्य न होते स्पष्ट कथितसे हें मनीं आण ॥ दुर्बुद्धी ही सोडुनि स्मर हरी नातरी तो यम उपटिल कान ॥ तुज साठीं मी प्रेमें झिजविन चंदन सम मम तनु ही छान ॥ सुखपभोगा भोगूं सखये दे दे आलिंगन चुंबन ॥ निर्लज्जा खरा तूं असती गांजिसि कितीरे मजसी॥ जन्मुनी वृथा कांहोसी निजकुळा नर्की बुडविसी ॥ तव वाणी जळो ॥ जिव्हा ही गळो ॥ अन्नोदक मज मोड न लागे ध्यास तुझा अवघा ह्मणुनी ॥ करी मत् त्राण वाहिले प्राण तुझ्या पदीं जाण विनतिही मान ॥ असाध्य वस्तु साध्य० ॥ १ ॥

ठुंबरी.

ह्मणुनि मशी तुह्मी कां बोलाना ॥ किंवा मजहुनि अन्य मि-

झाली चतुर अंगना ॥ ध्रु० ॥ अथवा असतां रंग महालीं ॥ मजकुण कांहीं चूक जहाली ॥ कांहीं समजेना ॥ ह्मणुनी० ॥१

तराणा.—( ताल त्रिवट, राग पूर्वी. )

नाद्रे दीम नाद्रे दीम ताधीम धीम ताताना ॥ ना तनाना तना तन दरेना तनों तदरे दानी दानी उदानि दानी तदानीं तदारे तारे दानी तदरे दान दानी ॥ नाद्रे ॥ ध्रु० ॥ नाद्रे नाद्रे धीम् धीम् तननननन तदारे तारे दानी इदर दानि दानी ॥ नाद्रे० ॥ १ ॥

पद. ( ब्यांडचे चालीवर )

वसे किती कठोर ही तुझिया मनीं ॥ कलंक डाग लावुनी कां घेसि या जनीं ॥ दुष्ट नीच घातकी हा कोण तव धनी ॥ विवेक शस्त्र धरुनी करीं टाकी छेदुनी ॥ करुनी पाप राक्षसी रती घोर या वनीं ॥ तयां पुढें गती पहा, तुं लक्ष देऊनी ॥ नीच दूत हाल करीत नेती येथुनी ॥ खचीतरे तयांसीं देती नरकीं लोटुनी ॥

अंजनीगीत.

मार्गावरुनी मिरवित नेती ॥ नानापरिच्या चेष्टा करिती ॥ जन ते सारे नयनीं बघती ॥ दुःख किती आहे ॥

साकी.

मरणावांचुनि वार्ता देण्या या नशिबा नच उरलें ॥ व्याघ्रकरीं जशी धेनु सांपडे तैसें होउनि गेलें ॥ आशा जरि धरिशी ॥ परि ती व्यर्थ असे साची ॥

पद. ( चाल—रमवायां जाऊं )

धीर नको सोडूं ॥ मना तूं ॥ ध्रु० ॥ भूत असो बा ॥ प्राणांतीं जरी संकट येवो ॥ शोध तियेचा काढूं मना ॥

पद. ( चाल—मदना चंद्रा सुवैरीतु० )

सखयानें या खरेंच वेड लाविलें ॥ आधींच सौंदर्य दाउनी स्वप्नीं चित्त असें मोहिलें ॥ ध्रु० ॥ येवोनि येथें कर मोडें

कोठें ऐशी दैववान्‌मी ॥ होइन प्रियकर तुह्मां नामी ॥ नकोच आसहि मजशी स्वामी ॥
खास अंतरिं धीर धरीं ॥ तुज सुख शिखरीं ठेविन खरी ॥ करीं० ॥ ३ ॥
धीर किती जरि धरिला तरी मी ॥ व्यर्थ असे हो सकलहि स्वामी ॥ उठाठेव ही नको रिकामी ॥
अदय किती तूं असशि तरी ॥ मज शांत करिं, रिपु ताप हरीं ॥ क० ॥ ४ ॥

पद. ( चाल–सगुण रूप निज० )

अससि गुणांची खाण ॥ प्रिय तूं ॥ अससि गु० ॥धृ० ॥पाहुनि कंठीं फांस तुझ्या मम, कंठीं आले प्राण ॥ प्रि० ॥ १ ॥
नको करूं हें साहस कांते, विनती ही मानिं आण ॥ प्रि० ॥२॥
फेंकुनि दे हा फांस झडकरीं,करिं आतां मत्प्राण ॥ प्रि० ॥३॥

बंजारा.

सखयांनों कोणि तरी दावा ॥ माझा तो प्राण विसावा ॥ ॥ धृ० ॥ त्या वांचून राहूं मी कैसी ॥ सोसूं कोठवर या विरहासी ॥ जाउन गृहीं आणवा गे ॥ माझा० ॥ १ ॥ तारुण्य माझें मुसमुसलें ॥ मदनानें चंचळ झालें ग ॥ कसा टाकुन गेला मला रावा ॥ माझा० ॥ २ ॥ तळमळतें मन राहिना ॥ निशिदिनीं चैन पडेना गे ॥ कसा साधुन गेला दावा ॥ माझा० ॥ ३ ॥ ह्या वसंत ऋतुची बहारी ॥ सख्याविणें भासे विषारीगे ॥ कुठें गेला मज नच ठावा ॥ माझा० ॥ ४ ॥ रंगमहालीं शेज म्यां केली ॥ सर्व रात्र व्यर्थ दवडिलीगे ॥ किती असा काळ कंठावा ॥ माझा० ॥ ५ ॥ मी दीन सख्याविण नारी ॥ कर जोडुनि विनंति करी ॥ सत्वरीं भेटिव मज देवा ॥ ६ ॥

सुरावर्त–त्रिवट, ( राग खमाज. )

गगसा गमप गमनिध मपधम गा॥ धनिसा सानिधप मगसा ॥

गगसा० ॥ ध्रु० ॥ गमधनिसा सानिधम पध पम गाम ॥ मध धनिसा गगरे साधनि सनीधप मग सा ॥ गग० ॥ १ ॥

( ठुंबरी–पुरज. )

बन्सी बजाजारे ॥ कन्हैया जरा बन्सी० ॥ जमुनाके तीर ॥ कन्हैया जरा बन्सी० ॥ ध्रु० ॥ बन्सी बजाई मोरी खुद बिसराइरे ॥ कन्हया जरा फिरके सुनाजारे ॥ जमुनाके० ॥ १ ॥

ठुंबरी.

ह्मणुनि मशीं तुह्मीं कांहो बोलाना ॥ किंवा मजहुनि अन्य मिळाली चतुर अंगना ॥ ध्रु० ॥ अथवा असतां रंगमहालीं ॥ मजकुण कांहीं चूक जहाली ॥ कांहीं समजेना ॥ ध्रु० ॥

दिंडी.

नये कच जरी आजि या ठाया ॥ प्राण त्यागिन मी अहो पितृराया ॥ निश्चय हा जाणें नच कधीं वाया ॥ काय सार्थक ठेवोनी ही काया ॥ १ ॥

केरवा. ( चाल–मी वेश्या खरी, मी वेश्या. )

सखे चारुसिले ॥ सखे चारुसिले ॥ ध्रु० ॥ कमलापरि मुख कमला पाहुनि ॥ मन लंपट मम जाहलें ॥ १ ॥ मजवरि कोण्या रोषें दोषें ॥ धरिली निष्ठुरता हृदयीं विमले ॥ २ ॥ तव स्वरुपातें पाहुनि मन्मन ॥ लुब्ध बहुतचि झालें ॥ ३ ॥ अधरामृत हें देउनि करि मम ॥ जन्म सफल विमले ॥ ४ ॥

पद. ( चाल–आह्मी नमु त्याला )

तोबी कच्चाबे कच्चा ॥ न साच गुरूका बच्चा ॥ ध्रु० ॥ तीरथ फिरकर जनम गमाया उम्मर जुगमें सारी ॥ धन कामिनको नजर न लावे जोग कमाया भारी ॥ रहि नहिं बाकी कछु शास्त्रमों पुरा ग्यानकूं पाया ॥ वेद विधीका मारग चलकर तनका लकरा कीया ॥ २ ॥

पद. ( रागिणी आनंदभैरवी, ताल धुमाळी. )

किति सांगुं तुला मज चैन नसे ॥ ध्रु० ॥ हें दुःख तरी मी

साहूं कसें ॥ या समयिं मला नच कोणि पुसे ॥ हा विरह सखे मज भाजितसे ॥ चाल ॥ मन कसें आवरूं ॥ किति धीर धरूं ॥ कसें करूं ॥ किति० ॥ १ ॥ हे बंधु नव्हत्त मम वैरी खरे ॥ दावीती कसे वरि प्रेम बुरें ॥ बोलोनी पाडीती हृदयासि घरे ॥ चाल ॥ नको नको मला जीव ॥ विष तरि पाजीव ॥ सखे सोडीव ॥ किति० ॥ २ ॥

ठुंबरी. ( ताल त्रिवट. )

प्रिये मज देईंगे रतिदान ॥ समयीं उत्तम स्थान ॥ ध्रु० ॥ कुसुमशरानें पीडितसें मीं ॥ जाती तुजविण प्राण ॥ १ ॥ यास्तव शांतवुनि या देहाला ॥ मम वचनातें मान ॥ २ ॥

पद. ( चाल—गोपाला मेरे करुणा क्या नहीं आयो० )

दयाळा स्वमनी इतुके निष्टुर कां झाला ॥ प्रेमझरा सुकुनि गेला ॥ धृ० ॥ कपटकृति उलट करुनी भ्रमला ॥ निष्टुर कां झाला ॥ सत्कीर्तीला कलंक लावुनी दोष न द्या स्वकुलाला॥१

साकी.

प्रेम असो मजवरी सदाही विनती मान्य करोनी ॥ या पदिं हें मन जडलें यास्तव जावें इजसिं वरोनी ॥ सुखवा ही दासी ॥ आहे सादर चरणांसी ॥ १ ॥

पद.

सासुबाई कांहो देतां शिव्या करूं काई काई ॥ घृ० ॥ घटासह पाण्या जातां कान्हा थई घाई घाई ॥ १ ॥ गोरसासह मथुरीं जातां आडवितो ठायीं ठायीं॥ २ ॥ तुकाराम बोले माझा अपराध नाहीं नाहीं ॥ ३ ॥

पद. ( चाल-नोहे नारी ही चंचल वल्ली० )

भासे कामाची लतिका मजला ॥ उत्सुक सौख्याला ॥ पूर्ण या पवनी अती प्रेमाचा बहर कसा तेजोमय आला ॥ घृ० ॥ कुच हे गुच्छापरि त्यावरी दिसती ॥ नयना सुखवीती ॥ गालीं लाली जणुं लुसलुस करिती ॥ अधरीं रस भरती ॥

ऐसी ही रम्य मनोहर मूर्ती ॥ मोहित मजवरती ॥ द्वैत भाव तव मानसीं कैसा ॥ विश्वाविण मी कां गुणीवंता ॥ १ ॥

होरी.

देखा किन्ने कन्हैया ॥ प्याराकी मुरलीवाला ॥ धृ० ॥ जमुना नीर तीर गय्यां चरावे ॥ खांदे कबरया काला ॥२॥ तुकाराम बलहारी किया है ॥ नित स्मरे पदकमलां ॥ २ ॥

पद. ( चाल—छकडीची. )

निसार तोरे नखरे नाजो अदापर निसार ॥ धृ० ॥ गोरे गोरे गालोंके बोसे पिलादे, दिलकोहो मेरे करार ॥ १ ॥ प्यारे प्यारे हातोंसे गले लगाले, तुजकोभी करलूं मय प्यार ॥ २ ॥ झाडुभी खाऊं मय लातोंभी खाऊं, खाऊं मय जुती पयजार ॥ ३ ॥ हातोंमें चुडियां नाकमें नथनी, पाऊंमें मोतिका हार ॥ ४ ॥

केरवा. ( चाल—छोरी बामनकी० )

मी वेश्या खरी, मी वेश्या खरी ॥ धृ० ॥ परी मम देहा पर पुरुषाचा स्पर्श न जाहला आजवरी ॥ १ ॥ द्युतामाजीं बहु पुरुषातें जिंकुनियां त्यां दास करी ॥ २ ॥ आज मला तुह्मीं जिंकियलें ही आनंदाची गोष्ट बरी ॥ ३ ॥ रती पती सम आपुल्या ह्या स्वरुपा कोण अभागिणी अव्हेरी ॥ ४ ॥ तन मन धन सर्वही अर्पियलें आपुलिया पदकमलावरी ॥ ५ ॥

साकी.

नहीं निकलके लेना साधु जालंदर खाईसे ॥गोपीचंदकू खाक करेंगे समजो होकर गुस्से ॥ बात न यहि भुलना ॥ आदेस मेरा अभि लेना ॥ १ ॥

पद. ( चाल—झाली सफलही मम कामना० )

देईं सखि मम शरिरालिंगना ॥ धृ० ॥ करिं भाषण बहु सखि सह प्रेमें ॥ लीलेनें सुख होइ मना ॥ १ ॥ हास्ययुक्त नयना-

चे प्रखर शर योजि ॥ कसे हृद्वेदना ॥ २ ॥ काधिं येइल दिन मद्भाग्याचा ॥ नच सोसति या वेदना ॥ ३ ॥

पद. ( चाल–सखे अशी धरिशि कां. )

बिऱ्हाड सोडुनी कितीक हिंदु दूबळीं ॥ रहाति येउनीच हिंदु-वस्ती देउळीं ॥ न आस चीजवस्तुचीहि त्यानीं ठेविली ॥ तयास खावयास देति वाणि जे बळी ॥ गरीबबापुडीं अशीच व्यर्थ गांजली ॥ प्रतिस्पार्धि यांस हीच स्थीति जाहली ॥ १ ॥

साकी.

जातां निजपति अस्ता जैशा कर्मलिणि सुकोनी जाती ॥ तशी सुन्दरा कोमल गात्रा सुखली किती हे दिसती ॥ कारण काय तरी ॥ खोचे हृदयीं तीक्ष्ण सुरी ॥ १ ॥

कटाव.

पाहुं पाहुं ही शोभा किती भी अति कौतुक झालें ॥ धृ० ॥ जिकडे तिकडे वृक्ष थाटले ॥ फुलफुलांनीं फार दाटले ॥ उपवन सुंदर दिसूं लागलें ॥ नगराभोवतीं मंडळ पडलें ॥ कल्पनगांचें पुंज वाढले ॥ सर्व रान हें सुमें वेढलें ॥ सर्वर्तु हे एके काळीं ॥ तांडव करिती पाहुनि यांतें ॥ नवल वाटलें ॥ चित्त फांकलें ॥ गुंग जाहलों ॥ स्मृति विसरलों ॥ थक्क मनामधिं फार जाहलें ॥ बहु हें अजिं कौतुक दिसलें ॥ १ ॥ मेघापासुनि मणिककनकांची ॥ वृष्टी होते बहुत सुखाची ॥ पवनगती अति मंद जाहली ॥ कोकिल किल किल बहुत वाढली ॥ पुण्यपुरी हे कशी शोभली ॥ जळीं वाटते झाली वसती ॥ नगरें भोंवतिं कोणीं बांधिलीं ॥ अकस्मात् हे कैसें घडलें ॥ देखुनि यातें नेत्र दीपले ॥ काम बाण मज टोचूं लागले ॥ हृदय फाटलें माझें बहु हें आजिं कौतुक दिसलें ॥ पाहुं पाहुं ही शोभा०॥२॥

लावणी०–( राग भूप कल्याण. )

सुवर्ण पात्रामध्यें अवघी पूजा घेतली भरून ॥ पारिजातक मालति बकुळी हार घेतले करून ॥ जाईजुई मोतियांमोगरां

आवडे हृदयीं धरून ॥ कनक पुष्प आणिलें कमळें पाण्यांतील उतरून ॥ चंदन भोलागिरी गंध केंशरी कस्तुरी वरून ॥ आणिक पुष्पें फळें मिळविली शिव ध्यानीं स्तव धरून ॥ दहीं दुध पंचामृत स्नान घालून या शिव मस्तकीं ॥ लक्ष बिल्वपत्र वाहिलें घेउनी तुळसिदल हस्तकीं ॥ नैवेद्य फळ तांबुल दक्षिणा घेउन आपुले हातीं ॥ लाउनियां कर्पूर उजळिला श्रीपार्वतीचा पती ॥ १ ॥

दिंडी.

मना ऐसा महाराज कोण आहे ॥ मृदु नवनीत जणुं कठिन वज्र पाहे ॥ वस्तु क्षणभंगुरिं मानितें सुखाला ॥ ब्रह्मरूपशस्त्रीं योगि जिंकी त्याला ॥ १ ॥

साकी.

जिंकुनि वादी सर्व पृथ्वीच्या दिग्विजयासि करावें ॥ भगवत्पूजा ब्रह्माद्वैतचि हे मत ह्मणिं स्थापावें ॥ मग निजधामाप्रती ॥ जावें बत्तीस वर्षांतीं ॥ १ ॥

पद. ( चाल—ठुंबरीची. )

कैसी दधिं बेचन जावूं ॥ जमुनाजीको तीर ॥ धृ० ॥ शिरपर मेरे घागर भारी दुजा सागर दूर ॥ १ ॥ एक कन्हय्या है तो हटेला दुजा माखन चोर ॥ २ ॥ है शामसे तेरे दरसन पासी ॥ दरसन दिजो रघुवीर ॥ ३ ॥

ठुंबरी. ( चाल—कोनगली गयो. )

कपटि महा गुरु द्रोण ॥ राजा क० ॥ धृ० ॥ ह्मणुनी द्रुपदें हांकुनि दिधलें ॥ राज्यांतुन हें जाण ॥ कपटि महा०॥धृ.॥१

साकी.

बडबड करितो फार मूर्ख हा अंगीं शौर्य नसोनी ॥ शासन करणें शस्त्रें ह्याला योग्य असे हें ह्मणुनी ॥ ऐशा या समया ॥ नको निवारूं तूं राया ॥

ठुंबरी.

सितम तोरी अखियां जादु भरी ॥ जादु भरी हो की टोना भरी, सितम तोरी अखियां जादु भरी । जादुकी पुडियां पढ़पढ़ के मारै । का करै बैद बिचारा ॥ सितम तोरी अखियां जादु भरी ॥ बडे बडे अखियों में कजरा सोहे । आशिकसे फिरता दिवाना ॥ सितम तोरी अखियां जादु भरी ॥

पद. ( चाल–ही यवनाची जात नीच० )

लोपली निती, ही कशी रिती, दुःस्थिती अती, दुर्जना तरी॥ सोडुनी भिती, मति भ्रष्टविती, वंदुं दुःख किती, शिवसुता तरी ॥ हे दयाघना, हरिं कुवासना, नीति दे जना, प्रभु कृपा करीं ॥ जन स्थिती मुळें, हें हृदय जळें, जागें कधीं भोळें, प्रभु निती खरी ॥ तुज वदूं मुखें, जानें वसूं सुखें, पडतील दुःखें कासें आह्मावरी ॥ सत्वरी दया, प्रभु करूनियां, ॥ दे सदा जया, प्रीति तूं धरीं ॥ १ ॥

ठुंबरी. ( भैरवी. )

रज वाडेका जाना छांड दे ॥ मैवारी ॥ मंदि लगावन तोरे हातियनमें ॥ मै० ॥ धृ० ॥ हमारे पियाकूं नित समजाऊं ॥ हमकूं सताना छांड दे ॥ मै० ॥ १ ॥

ठुंबरी–पीलु.

हो मारो मन काये लिनो रे ॥ प्रीत करे कछु बेर बुसाई ॥ हो मारो० ॥ धृ० ॥ या कुवरी संग प्रीत लगाई ॥ जीय वानी कसे जा ॥ हो० ॥ १ ॥

अंजनीगीत.

गोपगाई त्या यमुनेच्या तटीं ॥ उदका येती सह जगजेठी ॥ खेळति चेंडु वाळवंटीं ॥ पाहुं चला दृष्टी ॥ १ ॥ चित्त विव्हला हरि देखाया ॥ उदकमीष चुकती न कराया ॥ बारासोळा त्या यदुराया ॥ पाहुं चला दृष्टीं ॥ २ ॥ ऐकुनियां हरी वेणु-

गीता ॥ तटस्थ होती गोपी तत्वतां ॥ तुकारामाच्या पुरवीं मनोरथा ॥ पाहुं चला दृष्टीं ॥ ३ ॥

लावणी ( ताल त्रिवट. )

मी कीती तरी करुं मनधरणी ॥ सख्याची ॥ रुसलां साजन आणा समजाउनी ॥ धृ० ॥ कोण्या सवतिनें मोहीलें तयाला भुलउनी नेला निज सदनीं ॥ १ ॥ रोष कशास्तव स्वामींनी धरिला जाउनी पुसा प्रियकरणी ॥ २ ॥

दिंडी.

काय शर्ती त्या असती सांग मातें ॥ तोषवावें या अतुर मन्मनातें ॥ सुखद अथवा दुःखद जरी होतो ॥ त्यजिन अथवा सेवीन विचारांतीं ॥ १ ॥

साकी.

इच्याहुनी मी तुला फांकडी गांठुन देतों आतां ॥ जें होणें तें होउनि गेलें न करीं किमपी चिंता ॥ युक्त्या किति नाथी ॥ सुचती मजला या कामीं ॥

कामदा.

स्पर्शितां तुला सौख्य प्रियकरी ॥ नेत्र चमकतां तव मृगापरी॥ आणि तो जरी कोप ये न तो ॥ शांत होतसे सत्य सांगतों॥

पद. ( चाल—गुरु दत्त निरंजन ब० )

मम चित्त ताप संहारी ॥ पार्वती अगे नगकुमरी ॥ भ्रांति
मनांतिल सोड सोडगे ॥ शांत वृत्ति स्वीकारीं ॥ भजसि
जयातें निशिदिनीं तो तुज प्रार्थितसे त्रिपुरारी ॥
सोड सोडरे दुष्ट पिशाचा ॥ गमसी मज भयकारी दाउनी
सोंगें फसवूं पहासी ॥
शंका सोड हि सारी ॥ मम चि० ॥
खास गमे मज असससी तूरे ॥ राक्षस मायाकारी ॥
रक्षणिं तव मी दक्ष असोनी ॥ घाबरसी कां भारी ॥

साहूं कसें ॥ या समयिं मला नच कोणि पुसे ॥ हा विरह सखे मज भाजितसे ॥ चाल ॥ मन कसें आवरूं ॥ किति धीर धरूं ॥ कसें करूं ॥ किति० ॥ १ ॥ हे बंधु नव्हत मम वैरी खरे ॥ दावीती कसे वरि प्रेम बुरें ॥ बोलोनी पाडीती हृदयासि घरे ॥ चाल ॥ नको नको मला जीव ॥ विष तरि पाजीव ॥ सखे सोडीव ॥ किति० ॥ २ ॥

ठुंबरी. ( ताल त्रिवट. )

प्रिये मज देईंगे रतिदान ॥ समयीं उत्तम स्थान ॥ धृ० ॥ कुसुमशरानें पीडितसें मीं ॥ जाती तुजविण प्राण ॥ १ ॥ यास्तव शांतवुनि या देहाला ॥ मम वचनातें मान ॥ २ ॥

पद. ( चाल–गोपाला मेरे करुणा क्या नहीं आयो० )

दयाळा स्वमनी इतुके निष्ठुर कां झाला ॥ प्रेमझरा सुकुनि गेला ॥ धृ० ॥ कपटकृति उलट करुनी भ्रमला ॥ निष्ठुर कां झाला ॥ सत्कीर्तीला कलंक लावुनी दोष न द्या स्वकुलाला॥१

साकी.

प्रेम असो मजवरी सदाही विनती मान्य करोनी ॥ या पदिं हें मन जडलें यास्तव जावें इजसिं वरोनी ॥ सुखवा ही दासी ॥ आहे सादर चरणांसी ॥ १ ॥

पद.

सासुबाई कांहो देतां शिव्या करूं काई काई ॥ धृ० ॥ घटासह पाण्या जातां कान्हा थई घाई घाई ॥ १ ॥ गोरसासह मथुरीं जातां आडवितो ठायीं ठायीं॥ २ ॥ तुकाराम बोले माझा अपराध नाहीं नाहीं ॥ ३ ॥

पद. ( चाल–नोहे नारी ही चंचल वल्ली० )

भासे कामाची लतिका मजला ॥ उत्सुक सौख्याला ॥ पूर्ण या पवनी अती प्रेमाचा बहर कसा तेजोमय आला ॥ धृ० ॥ कुच हे गुच्छापरि त्यावरी दिसती ॥ नयना सुखवीती ॥ गालीं लाली जणुं लुसलुस करिती ॥ अधरीं रस भरती ॥

ऐसी ही रम्य मनोहर मूर्ती ॥ मोहित मजवरती ॥ द्वैत भाव तव मानसीं कैसा ॥ विश्वाविण मी कां गुणीवंता ॥ १ ॥

होरी.

देखा किन्ने कन्हैया ॥ प्याराकी मुरलीवाला ॥ धृ० ॥ जमुना नीर तीर गय्यां चरावे ॥ खांदे कबरया काला ॥१॥ तुकाराम बलहारी किया है ॥ नित स्मरे पदकमला ॥ २ ॥

पद. ( चाल—छकडीची. )

निसार तोरे नखरे नाजो अदापर निसार ॥ धृ० ॥ गोरे गोरे गालोंके बोसे पिलादे, दिलकोहो मेरे करार ॥ १ ॥ प्यारे प्यारे हातोंसे गले लगाले, तुजकोभी करलूं मय प्यार ॥ २ ॥ झाडुभी खाऊं मय लातोंभी खाऊं, खाऊं मय जुती पयजार ॥ ३ ॥ हातोंमें चुडियां नाकमें नथनी, पाऊंमें मोतिका हार ॥ ४ ॥

केरवा. ( चाल—छोरी बामनकी० )

मी वेश्या खरी, मी वेश्या खरी ॥ धृ० ॥ परी मम देहा पर पुरुषाचा स्पर्श न जाहला आजवरी ॥ १ ॥ द्युतामाजीं बहु पुरुषातें जिंकुनियां त्यां दास करी ॥ २ ॥ आज मला तुह्मी जिंकियलें ही आनंदाची गोष्ट बरी ॥ ३ ॥ रती पती सम आपुल्या ह्या स्वरुपा कोण अभागिणी अव्हेरी ॥ ४ ॥ तन मन धन सर्वही अर्पियलें आपुलिया पदकमलावरी ॥ ५ ॥

साकी.

नहीं निकलके लेना साधु जालंदर खाईसे ॥गोपीचंदकू खाक करेंगे समजो होकर गुस्से ॥ बात न यहि भुलना ॥ आदेस मेरा अभि लेना ॥ १ ॥

पद. ( चाल—झाली सफलही मम कामना० )

देईं सखि मम शरिरालिंगना ॥ धृ० ॥ कारें भाषण बहु सखि सह प्रेमें ॥ लीलेनें सुख होइ मना ॥ १ ॥ हास्ययुक्त नयना-

चे प्रखर शर योजि ॥ कसे हृद्वेदना ॥ २ ॥ काधिं येइल दिन मद्भाग्याचा ॥ नच सोसति या वेदना ॥ ३ ॥

पद. ( चाल—सखे अशी धरीशि कां. )

बिऱ्हाड सोडुनी कितीक हिंदु दूबळीं ॥ रहाति येउनीच हिंदु-वस्ती देउळीं ॥ न आस चीजवस्तुचीहि त्यानीं ठेविली ॥ तयास खावयास देति वाणि जे बळी ॥ गरीबबापुडीं अशीच व्यर्थ गांजली ॥ प्रतिस्पर्धि यांस हीच स्थीति जाहली ॥ १ ॥

साकी.

जातां निजपति अस्ता जैशा कमलिणि सुकोनी जाती ॥ तशी सुन्दरा कोमल गात्रा सुखली किती हे दिसती ॥ कारण काय तरी ॥ खोचे हृदयीं तीक्ष्ण सुरी ॥ १ ॥

कटाव.

पाहुं पाहुं ही शोभा किती मी अति कौतुक झालें ॥ धृ० ॥ जिकडे तिकडे वृक्ष थाटले ॥ फुलफुलांनीं फार दाटले ॥ उपवन सुंदर दिसूं लागलें ॥ नगराभोवतीं मंडळ पडलें ॥ कल्पनगांचें पुंज वाढले ॥ सर्व रान हें सुमें वेढलें ॥ सर्वर्तु हे एके काळीं ॥ तांडव करिती पाहुनि यांतें ॥ नवल वाटलें ॥ चित्त फांकलें ॥ गुंग जाहलों ॥ स्मृति विसरलों ॥ थक्क मनामाधिं फार जाहलें ॥ बहु हें आजिं कौतुक दिसलें ॥ १ ॥ मेघापासुनि मणिकनकांची ॥ वृष्टी होते बहुत सुखाची ॥ पवनगती अति मंद जाहली ॥ कोकिल किल किल बहुत वाढली ॥ पुण्यपुरी हे कशी शोभली ॥ जळीं वाटते झाली वसती ॥ नगरें भोंवतिं कोणीं बांधिलीं ॥ अकस्मात् हे कैसें घडलें ॥ देखुनि यातें नेत्र दीपले ॥ काम बाण मज टोचूं लागले ॥ हृदय फाटलें माझें बहु हें आजिं कौतुक दिसलें ॥ पाहुं पाहुं ही शोभा० ॥ २ ॥

लावणी ०—( राग भूप कल्याण. )

सुवर्ण पात्रामध्यें अवघी पूजा घेतली भरून ॥ पारिजातक मालति बकुळी हार घेतले करून ॥ जाईजुई मोतियांमोगरां

आवडे हृदयीं धरून ॥ कनक पुष्प आणिलें कमळें पाण्यांतील उतरून ॥ चंदन मोलागिरी गंध केंशरी कस्तुरी वरून ॥ आणिक पुष्पें फळें मिळविली शिव ध्यानीं स्तव धरून ॥ दहीं दुध पंचामृत स्नान घालून या शिव मस्तकीं ॥ लक्ष बिल्वपत्र वाहिलें घेउनी तुळसिदल हस्तकीं ॥ नैवेद्य फळ तांबुल दक्षिणा घेउन आपुले हातीं ॥ लाउनियां कर्पूर उजळिला श्रीपार्वतीचा पती ॥ १ ॥

दिंडी.

मना ऐसा महाराज कोण आहे ॥ मृदु नवनीत जणुं कठिन वज्र पाहे ॥ वस्तु क्षणभंगुरें मानितें सुखाला ॥ ब्रह्मरूपशस्त्रीं योगि जिंकी त्याला ॥ १ ॥

साकी.

जिंकुनि वादी सर्व पृथ्वीच्या दिग्विजयासि करावें ॥ भगवत्पूजा ब्रह्माद्वैतचि हे मत झणिं स्थापावें ॥ मग निजधामाप्रती ॥ जावें बत्तीस वर्षांतीं ॥ १ ॥

पद. ( चाल—ठुंबरीची. )

कैसी दधि बेचन जावूं ॥ जमुनाजीको तीर ॥ धृ० ॥ शिरपर मेरे घागर भारी दुजा सागर दूर ॥ १ ॥ एक कन्हय्या है तौ हटेला दुजा माखन चोर ॥ २ ॥ है शामसे तेरे दरसन पासी ॥ दरसन दिजो रघुवीर ॥ ३ ॥

ठुंबरी. ( चाल—कोनगली गयो. )

कपटि महा गुरु द्रोण ॥ राजा क० ॥ धृ० ॥ ह्मणुनी द्रुपदें हांकुनि दिधलें ॥ राज्यांतुन हें जाण ॥ कपटि महा०॥धृ.॥१

साकी.

बडबड करितो फार मूर्ख हा अंगीं शौर्य नसोनी ॥ शासन करणें शस्त्रें ह्याला योग्य असे हें ह्मणुनी ॥ ऐशा या समया ॥ नको निवारूं तूं राया ॥

ठुंबरी.

सितम तोरी अखियां जादु भरी ॥ जादु भरी हो की टोना भरी, सितम तोरी अखियां जादु भरी । जादुकी पुडियां पढ़पढ़ के मारै । का करै बैद बिचारा ॥ सितम तोरी अखियां जादु भरी ॥ बडे बडे अखियों में कजरा सोहे । आशिकसे फिरता दिवाना ॥ सितम तोरी अखियां जादु भरी ॥

पद. ( चाल–ही यवनाची जात नीच० )

लोपली निती, ही कशी रिती, दुःस्थिती अती, दुर्जना तरी॥ सोडुनी भिती, मति भ्रष्टविती, वंदुं दुःख किती, शिवसुत। तरी ॥ हे दयाघना, हरिं कुवासना, नीति दे जना, प्रभु कृपा करीं ॥ जन स्थिती मुळें, हें हृदय जळें, जागें कधीं मीळें, प्रभु निती खरी ॥ तुज वदूं मुखें, जानिं वसूं सुखें, पडतील दुःखें कासिं आह्मावरी ॥ सत्वरी दया, प्रभु करूनियां, ॥ दे सदा जया, प्रीति तूं धरीं ॥ १ ॥

ठुंबरी. ( भैरवी. )

रज वाडेका जाना छांड दे ॥ मैंवारी ॥ मंदि लगावन तोरे हातियनमें ॥ मै० ॥ धृ० ॥ हमारे पियाकूं नित समजाऊं ॥ हमकूं सताना छांड दे ॥ मै० ॥ १ ॥

ठुंबरी–पीलु.

हो मारो मन काये लिनो रे ॥ प्रीत करे कछु बेर बुसाई ॥ हो मारो० ॥ धृ० ॥ या कुवरी संग प्रीत लगाई ॥ जीय वानी कसे जा ॥ हो० ॥ १ ॥

अंजनीगीत.

गोपगाई त्या यमुनेच्या तटीं ॥ उदका येती सह जगजेठी ॥ खेळति चेंडु वाळवंटीं ॥ पाहुं चला दृष्टी ॥ १ ॥ चित्त विव्हला हरि देखाया ॥ उदकमीष चुकती न कराया ॥ बारासोळा त्या यदुराया ॥ पाहुं चला दृष्टीं ॥ २ ॥ ऐकुनियां हरी वेणु-

गीता ॥ तटस्थ होती गोपी तत्वतां ॥ तुकारामाच्या पुरवीं मनोरथा ॥ पाहुं चला दृष्टीं ॥ ३ ॥

लावणी ( ताल त्रिवट. )

मी कीती तरी करूं मनधरणी ॥ सख्याची ॥ रुसलां साजन आणा समजाउनी ॥ धृ० ॥ कोण्या सवतिनें मोहीलें तयाला भुलउनी नेला निज सदनीं ॥ १ ॥ रोष कशास्तव स्वामीनी धरिला जाउनी पुसा प्रियकरणी ॥ २ ॥

दिंडी.

काय शर्ती त्या असती सांग मातें ॥ तोषवावें या अतुर मन्मनातें ॥ सुखद अथवा दुःखद जरी होतो ॥ त्यजिन अथवा सेवीन विचारांतीं ॥ १ ॥

साकी.

इच्याहुनी मी तुला फांकडी गांठुन देतों आतां ॥ जें होणें तें होउनि गेलें न करीं किमपी चिंता ॥ युक्त्या किति नाथी ॥ सुचती मजला या कामीं ॥

कामदा.

स्पर्शितां तुला सौख्य प्रियकरी ॥ नेत्र चमकतां तव मृगापरी ॥
आणि तो जरी कोप ये न तो ॥ शांत होतसे सत्य सांगतों ॥

पद. ( चाल—गुरु दत्त निरंजन ब० )

मम चित्त ताप संहारी ॥ पार्वती अगे नगकुमरी ॥ भ्रांति
मनांतिल सोड सोडगे ॥ शांत वृत्ति स्वीकारीं ॥ भजसि
जयातें निशिदिनिं तो तुज प्रार्थितसे त्रिपुरारी ॥
सोड सोडरे दुष्ट पिशाचा ॥ गमसी मज भयकारी दाउनी
सोंगें फसवूं पहासी ॥
शंका सोड हि सारी ॥ मम चि० ॥
खास गमे मज असशी तूरे ॥ राक्षस मायाकारी ॥
रक्षणिं तव मी दक्ष असोनी ॥ घाबरसी कां भारी ॥

जटा जूट शिरीं गंगा विलसे ॥ त्रिशूळ डमरूधारी ॥तो शिव
शंकर रक्षिल मजला ॥
मीच सखे त्रिपुरारी ॥ मम चि० ॥
मूढा श्रम हे घेसि कशाला ॥ होति न तुज सुखकारी ॥ प्राण
वाहिले शंकरचरणीं ॥
शांति सुखें घे सारीं ॥ मम० ॥
शांति सुखाचा ठेवा माझा ॥ तोच असे गिरधारी ॥ त्याविण
भासे शून्य सकल मज ॥
तव दासा या तारी ॥ मम० ॥

ठुंबरी.

एक पल निंद न आवे ॥ आवे दय्यां एक पल ॥ पिया बिन शिया घबरावे घबरावे ॥ दय्यां एक० ॥ धृ० ॥ शाम सखेरी मिल येई बखतु है ॥ प्रीत लगावे पछतावे पछतावे ॥ दय्या एक० ॥ १ ॥

ठुंबरी ( पिलु, जिल्हा.)

पिया परदेस ॥ देसने सखी जाऊंरी ॥ हाजी हारे मत जावो पिया परदेस ॥ धृ० ॥ कबकी मैं उभी ठाडी अरज करतरे इतनी अरज मोरी मान ॥ अरे हारे मत जावो पिया०॥ १ ॥

ठुंबरी.

तन मन धन हें अर्पण केलें रे ॥ गूण सगुण गुण माझ्या मनिं भरलें ॥ त्या योगें हें मन धालेंरे ॥ धृ० ॥ सर्व चित्त तुझे पायीं असोनी ॥ प्रेमरसें हें रंग रंगीले ॥ तनमन धन० ॥

धृपद. ( चौताल राग पूर्वी. )

क्रीट मुकुट सी सधाय मोती योनि माला डगले कानेमें कुंडल वाकि धनुख बान शोभे ॥ धृ० ॥ तेरोही सरूप रूप आंत हीं सुभानु लागे नैनके झरुके बैठी सम चंद्र शोभे ॥ कट० ॥

पद.

आज दुःखाचा दिवस वाटतो मजला ॥ साहुं कशी मी विर-

हाला ॥ धृ० ॥ नाथा जाण्याचा हट्ट कासया असला ॥ इथें काय उणें तुह्मांला ॥ चाल ॥ मग कांहो त्यजितां दासि ॥ लागला कुण्या छंदासि ॥ चाल ॥ करि विनंती आणावि कांहिं दया चित्ताला ॥ त्यजितां कां नाथा मजला ॥

अंजनीगीत.

वाचिल जो या ममाक्षरासी ॥ साह्य करिन मी सत्वरी त्यासी ॥ सत्य माना मद्वचनासी ॥ बंदीवासांनो ॥

ठुंबरी.

राधा राणी तूं मुखमे बोल ॥ क्या मूसें चूक परी ॥ राधा ॥ सगर हे नामो हे तलपत ॥ हस हस घुंघट खोल॥राधा राणी ॥

पद. ( चाल-कोन गली ग० )

इष्ट असे तुह्मां ॥ प्रिया जें ॥ धृ० ॥ साह्य कराया सिद्ध मी अबला ॥ नाट्यकलेमधिं अति तुह्मीं रमलां ॥ बहु उद्योगी सदैव ठरलां ॥ चैन नसे आह्मां ॥

पद.

तू मेरे प्राण आधार ॥ प्रभुजी तूं मेरे प्राण आधार ॥ धृ० ॥ नमस्कार दंडवत बंदना । अगकवार जाऊं वार ॥ प्रभु०॥१॥ उठत बैठत सोवत जागत । ये मन तुजहि चितार ॥ प्रभु० ॥ ॥ २ ॥ सुख दुःख मनकी सबही वृथा । तुजही आज्ञा सार ॥ प्रभु० ॥ ३ ॥ तूं मेरे ओट बुद्ध धन तुमही ॥ तूं मेरे परवार॥ प्रभु० ॥ ४ ॥ जो तुम करो सोई फल हमरे । पेख नानक गुरु चरणार ॥ प्रभु० ॥ ५ ॥

पद. चाल—राम स्मरावा राम. )

फार मनीं उल्हास ॥ आजि मज फार मनीं उल्हास ॥ होत असे भजनास ॥ आजि ॥ धृ० ॥

हरि पद पंकाजिं सेवनि मधुच्या, सुख जसें भ्रमरास ॥ १ ॥
भवभय भंजन अघनग निरसन, होत असे जागीं खास ॥ २ ॥

जप तप साधन कांहि नको जरि, नाम करी मौंन वास॥३॥
हरिभक्ताचें मन बहु रमतें, गणपतीपद नमनास ॥ आजि ॥

धृपद. ( राग—बिहाग ताल—तेवडा. )

लाल मैं तौ जान न देऊं पन छन रगंमचाऊं ॥ अंतरा ॥
भर भर मुठी तक तक मारत सोही रंग बिगाऊं ॥

लावणी.

नाटकी कृष्ण नंदाचा यशोदेस बाई ॥ आडवितसे गवळणी येउन ठाईं ठाईं ॥ एके दिवशीं साऱ्या गौळणी गेलों पाण्याला ॥ गेलों पान्या येउनियां मुकुंदें अडवियलें आह्माला ॥ आह्मी सर्वही मिळुनि नारींगे बसलों होतों कळंबाचे खालीं ॥ अवचित तुझा सांवळा आला ॥ धरुनि हात पाहिलें मला ॥ कोंडीबा सींवा ह्मणती बहार जाहला ॥ मंदिरांत घेउन गौळणि हरी गेला ॥ नाटकी कृष्ण नंदाचा सांगतों तुजला ॥ मंदिरांत गौळणी घेउन ॥ १ ॥

ठुंबरी. ( राग शंकरा भरण ताल— त्रिवट. )

कान्हा छांड बहियां ॥ तुम ठाकुर कर कैयां देखो मोरी मैयां ॥ धृ० ॥ तूं मतकर बलजोरी ॥ दधकी मटकी सरिभारी ॥ झटकत क्यों चुनरी मे ॥ बात करत है टेढी तोसोंदेओंगी गारी ॥ १ ॥

ठुंबरी. ( राग—झिंझोंटी ता. त्रिवट. )

जीरारे लगाये लिनोजा ॥ अरे हा ॥ मै वारी ॥ ज्यातरे सखी मोरारे ॥ अरे हा ॥ हमारे तलावती सिंगेरे मछलिया बन्सीया बजायो ॥ लिनो जा ॥ अरे हा ॥ १ ॥

पद. ( रांग कल्याणी—ताल त्रिवट. )

हरिल अघभार करिल भवपार विश्वाचा आधार गाहो गाहो जगदुद्धार ॥ धृ० ॥ सुविमलचित्तीं भाव करा दृढ ॥ सोडुनि विषय असार ॥ विश्वाचा० ॥ १ ॥ सत्संगातें जोडुनि प्रेमें । भचन करा अनवार ॥ विश्वाचा० ॥ २ ॥

लावणी०-( राग मुलताना एकताल. )

मुळारंभीं कथा सांगतें ऐकुन घ्यावी गुणवंता ॥ सहज आलें यात्रेस गांठ अवचित पडली पंढरीनाथा ॥ नेत्र भरून पाहिलें तुह्माला आनंदलें चंद्र पाहतां ॥ तुजसंगें प्रीत असावी कधीं पावसी पंढरीनाथा ॥ नाभीकमळापासुन इच्छितें तेव्हां मजकडे तुह्मीं पाहतां ॥ खुशीझाली एकमेकां वरती गाठ पडेल कधीं एकांता ॥ मर्यादा ठेवून बिचारें नगरा या आमच्या आतां ॥ प्रीतीचीं लक्षणें एकतें प्रीत करूं असें वाटतें ॥ १ ॥

बंजारा ( सुदरस्त्रीविषयीं. )

एक नार पाहिली खाशी ॥ चमके जणु वीज आकाशीं ॥ध्रु०॥ सकुमार कांति सुमनाची ॥ चंद्रापरि या वदनाची ॥ मोहकता भुलवी मनासी ॥ १ ॥ भिंवया जणु धनु सुलतानी ॥ मारि बाण नेत्राचे कसुनी ॥ करि बार जखम हृदयाशी ॥ २ ॥ रंग गुलाबी गालावरती ॥ कोमलता किति लुसलुसती ॥ काधिं पाजिल अधरसुधेसी ॥ ३ ॥ मधुर मंजुळ असे बोली ॥ लज्जीत कोकिला केली ॥ नसे उणीव अवयवासी ॥ ४ ॥ चक्रवाक पक्षी जैसे ॥ शोभती कुचद्वय तैसे ॥ बघतां जागवि कामासी ॥ ५ ॥ ही सुंदरि काधिं संगाला ॥ देईल उडवि रंगाला ॥ ह्मणे त्रिंबक पाळि व्रतासी ॥ एक नार० ॥ ६ ॥

दिंडी.

अक्षरें हीं वाचितां तये वेळीं ॥ पातला तो वेताळ महा वाली ॥ जया योगें तो बंदिमुक्त झाला ॥ परि गेला विसरोनि सत्यभूला ॥

लावणी. ( धरूनि मुशाफर वेष० )

मंदिर शोभा पाहुनि रिझलें मन्मन बहु अंतरीं ॥ वेश्याजन किती गायन करिती बैसुनी नानापरी ॥ ध्रु० ॥ परोपरींचीं पुष्पें घेउनी गुंफिती किती नारी ॥ चिक वाळ्याचे पडदे झुलती हळु हळु खिडक्यावरी ॥ १ ॥ मोर मयूरी आनंदानें क्री-

डति गच्चीवरी ॥ पृंष्ठीमाजी मणि मणि दिसती सुखविती देहांतरी ॥ चाल ॥ सुवर्ण मंडित घेऊन त्या घागरी, कोणी सिंचिति नारी सुगंधशा तरुवरी॥दक्ष राहाती निज कार्यी जन कितितरी ॥ चाल ॥ पाहुनि ऐसी सुखद शोभा भासे इंद्रपुरी॥ अंत न लागे चलना पावे मन्मथ हृदयांतरीं ॥ १ ॥

साकी.

रजनि अथवा दिन असे हें नकळे कि मजलागीं ॥ अंधःकारा वांचुनि भासे कांहीं न मज याजागीं ॥ ह्मणुनी मजला तो ॥ मृत्युच बरा दिसतो ॥ १ ॥

पद.

मज नाहीं जिवाची आशारे ॥ कां दिसती शून्यचि दिशा ॥ ॥ धृ० ॥ शूर हा न्यायपदारुढ ॥ होतां देईल फांसारे ॥ ॥ मज० ॥ मरण मला तें बरवें दिसतें ॥ झाली सर्व निराशारे ॥ मज० ॥

पद. ( चाल–नाहीं झाले षण्मास० )

सप्त पूर्णमास मला झाले येउनी ॥ प्रियेची ती आशा होती बहुत मन्मनीं ॥ धृ० ॥ जैसा मी तैशी ती शोक युक्त का ॥ धीरयुक्त वचनें मना देत असेल का ॥ मानस हा शूरसेन नेतो लया का ॥ दुःखद हेंचि मन्मनीं ॥ स० ॥

पद. ( राग भैरव. )

बासुरी बजाय, आज रंगसो मुरारी ॥ शिव समाधि भूलि गयी, मुनि मनकी तारी ॥ बा० ॥ धृ० ॥ वेद भनत ब्रह्मा भुले, भुले ब्रह्मचारी ॥ सुनतही आनंद भयो, लगी है करारी ॥ बांसु० ॥ १ ॥ रंभा सब चाल चुकी, भूमी नृत्य कारी ॥ यमुना जल उलटीवाहे, सुधि ना सह्मारी ॥ बांसु० ॥ २ ॥ श्रीवृंदाबन बंशी बजी, तीन लोक प्यारी ॥ ग्वाल बाल मगन भयीं, व्रजकी सब नारी ॥ बांसु० ॥ ३ ॥ सुंदर श्याम

मोहन मूरति, नटवर वपुधारी सुरकिशोर मदन मोहन, चरण कमल बलिहारी ॥ बासुरी० ॥ ४ ॥

पद. ( चाल–लग्नाला जातों मी. )

कर्ममार्ग प्रवृत्ति झाणिं करावया ॥ अजि मंडनमिश्र गेहिं चला जाऊं या ॥ धृ० ॥ कळवुनियां नृपसद्गुण ॥ घेऊं साह्य त्यापासून ॥ कर्ममार्ग प्रवृतन ॥ टाकूं त्वरित तें उरकून ॥ यावया न कोणी राहि मजसि व्यत्यया ॥ १ ॥

लावणी.

अहो पतिराया पडतें मीं पायां सोडा रांडबाजी ॥ सखया सोडा रांडबाजी ॥ मीं घरची कामिनी असोनि नाहीं मजवर मर्जी ॥ नानातऱ्हेचीं पुष्पें सुगंधिक आणुनियां देतें ताजीं ॥ ॥ सखया० ॥ परंतु ऐका सांगतें तुह्माला सोडा रांडबाजी ॥ जोंवरी पैसा तंव तुह्मी बैसा ह्मणतील रांडापोरें ॥ हारतुरे आणुन गुंफुन देतें ताजे ॥ अहो तुह्माला ताजे मी देतें ॥ परंतु एक सांगत्यें तुह्माला ॥ सोडा रांडबाजी ॥ १ ॥

पद. ( धमार. )

अरिकरांतुनि सोडवितों झडकरी तुज चंद्रिके ॥ न करि चिंता किमपि मानिं तूं ऐक बचना सारके ॥ धुळदाणी करुनि अरिचीं उडवितों बघ मस्तकें ॥ नरहरीचें नांव घेउनि जिंकितों बघ कौतुकें ॥ १ ॥

पद. ( राग-जोगी. )

तात, दावा, कच मला ॥ आतां आहे कोठें ॥ धृ० ॥ दुष्टें विपिनीं वधिला साच ॥ करुनी नानापरींचा जाच ॥ सागरिं नेउनि त्यजिला तसाच ॥ नाहीं आच कवणासीं ॥ ताता दावा कच मजला ॥ आतां आहे कोठें ॥ १ ॥ गुरुसुत माझें प्रेमस्थान ॥ माझा केवळ पंचहि प्राण ॥ कवण देईल मजला दान ॥ बहुसन्मान करूनियां ॥ ताता दावा कचमजला ॥ आतां आहे कोठें ॥ २ ॥ त्याविण झाल्यें सुमनीं उदास ॥

झाला शरीरातें बहु त्रास ॥ पाहूं कवणाची मी वास ॥ सौख्य ऱ्हास घडला कीं ॥ ताता दावा कच मजला ॥ आतां आहे कोठें ॥ ३ ॥

साकी.

वर्षुनियां पर्जन्य भूवरी सुखवो सर्वत्रांना ॥ लोक उद्यमा करूनियां प्रभु काढोत विविध कळांना ॥ मद्धंधूसम जे ॥ त्यांना हेंचि वचन साजे ॥

पद. ( चाल—राम भजनसों. )

नित्य हरीला स्मरा । सुजनहो नित्य हरीला स्मरा ॥ ध्रु० ॥
जपतपसाधन होय अकारण ॥ ईश भजनपथ खरा ॥ सु० ॥१ ॥
नको त्याग संसारसुखाचा ॥ वास वनीं नचिबरा ॥ सु० ॥२॥
नाममंत्र भवतारक जपतां ॥ सहज मुक्ति ये घरा ॥ सुज० ॥ ३ ॥

पद. ( चाल—रुचति कां तीर्थयात्रा० )

भय नाहीं मज यमाचें जाणेंना गुरुमती ॥ तनु माझी सुखी पाही सुंदरिचा अधिपती ॥ गुरु करसें नच वदावें मातोश्री मारुती ॥ करिं दुसरी कांहिं आज्ञा मी हर्षें पाळितों ॥ १ ॥

पद. ( राग--होरी. )

सावरे मोकूं रंगमें रोरी रोरी, सांवरे मोकूं रंगमें रोरी रोरी ॥ ध्रु० ॥ बहीयां पकर कर शीरकी गागरिया ॥ छिनायके शीर ढोरी ॥ रंगमें रस बस मोकूं किनी ॥ डारी गुलाबकी झोरी ॥ गावत लागे मुखसे होरी ॥ सांवरे० ॥ १ ॥ आयो अचानक मिल्याहै मंदिरमें ॥ देखत नवल किशोरी ॥ धरी भुजा मौकुंरे पकरी, जीवनने बलजोरी ॥ माला मोतियनकी तोरी ॥ सां० ॥ २ ॥ तब मोरे जोर कछ ये सब चाल्यो ॥ बात कठीन सुनाई ॥ तबसें उनंकू नैन दिखायो, मत जानो मोकू भोरी ॥ जानु तोरे चितकी चोरी ॥ सां० ॥ ३ ॥ मरजाद मेरी कछु ये नव राखी, कुंचवेकी कस तोरी ॥ सूरदास प्रभु

तुमारे मिलनकूं, मोकूं रंगमें रोरी ॥ गईती में नंदजीकी पोरी ॥ सां० ॥ ४ ॥

पद. ( चाल—त्या अनंगा धीर नसे० )

हा कठोरा मनुज असुनि तूं असुराहून तूं असुर खरा ॥ दया नसे तव हृदयिं जरारे, असुराहून तूं असुर खरा ॥
सर्प-कुलाला कलंक लावुनि । घेसी कांगे समजुनि उमजुनि ॥
नवल वाटतें तव कृति बघुनि ॥
सर्प-सुता । मन शांत अतां । करिं राजसुता । धरुनि ममता ॥ नरा वांचुनि शांति न मारा । आंवरू किती प्रेमझरा॥
दुष्ट जारिणी ही तव करणी । पाहुनि लाजे बघगे तरणी ॥
व्यर्थ करीसी कां मन धरणी ॥
प्रीति धरीं हृदयांत खरी । नच कोप करीं । प्रिय दासिवरी ॥
॥ नरा वांचुनि० ॥
हा जारिणी संग नको । तव कांहीं नको । मृत्यु बरागे मृत्यु बरा ॥
दया नसे तव हृदयिं जरारे असुराहूनि तूं असुर
चपलेहुनि या चपल कामिनी ॥ नरा जिंकिती मोह घालुनी
नुमजे कोणा अघटित करणी ॥
अदय किती । नर हे कुमती ॥ भोळ्या युवती असति जगतीं॥
नरा वांचुनि शांति न० ॥

ठुंबरी.

सयां लागी रे मेरी जान ॥ धृ० ॥ रावन मारी छुरी कटारी॥ ना बरची तलवार ॥ सयां ला० ॥

ठुंबरी.

छांड लंग रवा गु रख मोरि बाइरे ॥ धीट भयो कछु नाहिं मानत नाहिंरे ॥ धृ० ॥ दौर झपट झटपट कुंजनमें नाहक पकरे शामने नाहक नाहक नाहकरे चंचल नार कच्छुत मोरि राईरे ॥ १ ॥

धृपद.

सास सदन मदन दरसनको ले पूजा जातू देखि ऐक बार ॥ ॥ सास० ॥ सहज निकट आये हारी हारक हारक पूछन लागे काहां जातु देखिय यहो कहे पकरलीनो बाको करकु हार ॥ सास० ॥ १ ॥

ठुंबरी.

गोरे तेरे नैन भय दो राजी ॥ धृ० ॥ क्या करे मुलना क्या करे काजी ॥ क्या करे घरका भाई निमका पाजी ॥ गोरे० ॥

ठुंबरी.

कन्हां मसी बोलूं नको ॥ माझी घागर गेली फुटून ॥ धृ० ॥ डोईवर घागर हाता मध्यें झारी ॥ जात होतें पाण्या जमुना तिरीं ॥ कसें करूं बाई अवचित आला गे ॥ सख्या मशीं बोलूं नको० ॥

पोवाडा.

छत्रपतीचें तक्त सातार ॥ मुळराजाचें घर कोल्हापुर ॥ इंग्रजाचें मुंबई शहर । आलीबाग कुलाब्या म्होर गड खांदीर उंदीर सुंदर । तळें कोंकण वसई बंदर । उंच वज्राबाईचा डोंगर । पाताळांतून निघे उन्ह पाणीवर । हाजी मलंग बाले पीर ॥ निजे सोन्याचे पलंगावर ॥ चांदबिबीचें पाहिलें नगर ॥ नवलक्षाचें तिचें एक पैंजर ॥ दहिवाडी पुढें पिंपरनेर ॥ खानदेशांत नंदुरबार ॥ माझ्या सख्याची सुरत लई अनिवार ॥ तूं केवडा मी केतकी नार ॥ धृ० ॥

पद. ( चाल–केलीस अशी काय. )

ब्राह्मणकुळीं भट्टपाद नाम जन्म रे ॥ भूपतीच्या साह्यानें जैन जिंकरे ॥ धृ० ॥ कर्ममार्ग प्रवृति करीत संचारे ॥ पूर्ण जयास्तव विधि तुज साह्य करीलरे ॥ त्यांवाचुनि अन्य कोणि न्नच समर्थरे ॥ १ ॥

अंजनीगीत.

मनापासुनी वरिलें नसतें ॥ अर्जुनि ठेविलें जितका असतें ॥
मग घेउनिकां संशय भलते ॥ त्रासवितां चित्ता ॥

पद. ( चाल—श्रीरघुवीर तुमरे. )

सैनीजन हे बसले उधळुनि धन आपुलें सारें ॥ पानसुपारी न मिळे ह्मणुनी हिंडतात घरदारें ॥ धृ० ॥ जुगार फांसे खेळाथाला किमपि ही वेळ न पुरे ॥ माध्यान्हीचा समय आलिया समजेल सुख तें खरें ॥ शुद्धीवर या डोळे उगडा हसती कीं हे बरें ॥ १ ॥

दिंडी.

स्पष्ट वेदा जे देति दूषणासी ॥ धरिती प्रत्यक्षचि वैर ब्राह्मणांसी ॥ कसे काढावे दिवस तयांसंगें ॥ ह्मणुनि वदलों हें नये भलं रागें ॥

पद. चाल—किती सुंदर रूप०

दया करो अब रच्छन करना यहि बिनती है मेरी ॥ नहिं तो साई जंगल जाऊं मोतनने यह तन घेरी ॥ धृ० ॥ अब मन मेरा चोकस राखूं ना जाऊं गुरु आघारी ॥ बचनेकी नहीं कभु मन मेरी ना देखूं सुख संसारीं ॥ १ ॥

पद. ( राग मांड, ताल दादरा. )

मम प्राणप्रिये सौख्य नसे तुजविणें मला ॥ विमल प्रेम राखीं सदा विनतिहि तुला ॥ धृ० ॥ कायकरूं यत्न नसे ह्मणून या रिति ॥ वागतसे खचित सखे कपटी नच कृति॥ त्यजुनि कोप शांत करीं दास आपुला ॥ १ ॥

पद.

क्या संकटमों पडा ॥ प्रभू मैं० ॥ धृ० ॥ परमेसर शेषशाई नामकूं लेके बनमें खडा ॥ प्रभू० ॥ १ ॥ औरत बच्चा नहिं समजके देख भटकत है सडा ॥ प्रभू० ॥ २ ॥ नारी जातका संग न होना किया चित्तका धडा ॥ प्रभु० ॥ ३ ॥

ठित झाली ती मती ॥ शास्त्रांची त्यांजपुढें चालेना गती ॥ मोहपाशीं गुंतुनि कां भ्रमविशी मती ॥ शरण जाइं जगदीशा त्यजुनि दुर्मती ॥

साकी.

तव गालीं कैशी ही दिसते गुलाबसुमसम कांती ॥ इच्छा मानसीं भ्रमरापरि गे मधुसेवन सुखशांती ॥ यास्तव चुंबन दे । माझें स्मरण हृदयिं असुं दे ॥ १ ॥

गझले झामीन.

दील हम किसी दिल बरसे लगाया न करेंगे ॥ फुरकतके सीतम रोझ उठाया न करेंगे ॥ साकी मैं वहदतका अगर जाम पीलावे ॥ हम होशमें अपने कभी आया न करेंगे ॥ मरजायंगे हम खाके छुरी हाथसे अपने ॥ वो चेहरए झेबा जो दीखाया न करेंगे ॥ मुशकील हये इलाजे ॥ दील बीमार तबीबो ॥ ईसाभी मेरे मरझको अछा न करेंगे ॥ तरसाए हए हरदम मुजे वो काफरे तरसा ॥ जब उसको न चाहेंगे तो तरसा न करेंगे ॥ दिल छीन लिया कत्ल किया घरसे निकाला ॥ क्या क्या न किया और वो क्या क्या न करेंगे ॥ हम आशके जांबाझ हएं कातील तहे खंजर ॥ तडपेंगे न चिल्लाएंगे नाला न करेंगे ॥ आबे दमे शमशीरसे कर हलक मेरा तर ॥ हम आबे बकाकीभी तमन्ना न करेंगे ॥ कासीद जो गया फिरके वो जिता नहीं आया॥आइंदा वहां खत कभी भेजा न करेंगे॥

पद. ( चाल—प्रतिकूल होईल कैसा० )

काय मौन धरिशी आतां समय योग्य आहे ॥ वचन सत्य करायातें आलों येथ पाहें ॥ धृ० ॥ गुरुलागिं यत्नें करुनी गेहिं पाठवीलें ॥ तुझे बोल आजवरी नाहीं उल्लंघीले ॥ म्हणुनि कां अंतीं ऐसें यश दाविपलें ॥ निरक्षीर आलिंगन देईं मज स्नेहें ॥ काय० ॥ १ ॥

दादरा.

लाखोटा कोणी धाडागे । माझ्या सखयाला ॥ पांच हिरे हे रुतती अंगाला गे ॥ डागीने नग चटकन कोणी काढा गे ॥

ठुंबरी.

राजविलासी प्रियकर माझा गे ॥ धृ० ॥ किती समजाऊं त्यांच्या जिवाला गे ॥ रा० ॥ जाउनि जाउनि आणा सखयाला गे ॥ घाबरला जीव दाबुनी धरिला गे ॥

लावणी. ( कोळ्याची. )

आयानो बायानों जातें मुलखाला ॥ सासरचे गावाला निघोनी गो ॥ सासुरवाडीसी कागद आयले ॥ बोलाविले माझ्या धन्यानि गो ॥ कोळीवाड्यामधीं जात नाय पहातें । पुसितें गलबत भाड्यानि गो ॥ माझ्या नाखवारे तुझ्या होडी मोल काय सांग ॥ आतां दरयाच्या पाण्याला आयलें तुफान ॥ आतां ढकल होडी फिरव सुकान ॥

पद. ( चाल—मी तप्त जरी. दादरा )

मज बोध करी ह्मणुनि कुणी शिकवी कां तुला ॥ कीं माझा स्नेहभाव कसुनि पाहिला ॥ धृ० ॥ किंवा मानीं कोप धरुनि तरलिके सर्वे ॥ तो निरोप मर्मभेदनासि धाडिला ॥ १ ॥

पद.

क्या सोहाए रंगे जो मोरा रंग, मोरे रंगसे हये खील रहो हर रंग ॥क्या० ॥ नीलमका हए रंग निराला, बरखाकी रुतमें झमके सो मोरा रंग ॥ क्या० ॥पुखराज हए हर रंगसे बाला, फसले खीजांपर चमके सो मोरा रंग ॥ क्या० ॥ लालरंगसे हए जग गुललाला, फसले बहारपर दमकेसो मोरा रंग ॥ क्या० ॥ सबजपरी मएं सबसे हुं आला, रुत बेरुतमें चमके सो मोरा रंग ॥ क्या० ॥

पद.

तूं कोणाची कामिनी ॥ सिंहकटी मृदु नितंबिनी ॥ कोण्या

ग्रामीं कोण्या वंशीं जनन जाहलें सांग तेथुनी ॥ सांग कोणता हेतु धरुनी आलिस ये स्थानीं ॥

पद. ( चाल—शैवालें युक्त जैसें० )

जें जें तूं बोलसी तें मजला का श्रुत नसे ॥ परि त्याचें काय आतां मज भरलें स्मरपिसे ॥ जाणसि तूं इंद्रियांचें चालक हें मन असे ॥ स्वाधिन तें पूर्ण झालें मदनाच्या करुं कसें ॥१॥

पद.

मोरी जान रहे तोरी जांकी अमन—मोरी० क्युं जी कुडहाए प्यारे दुं मैं रुपइया ॥ तोहेपे वारु तन मन धन—मोरी० ॥

पद. ( चाल—रसिके वरती तल्लिन मन )

मूढ मतिचे हिंदु आम्हि बहुता दिवसा पासोनी ॥ नीचाचरणा अचेत गेलों पर धर्मासि सेवोनी ॥ वाटे ना परि, अज वरि तरि, शके आठराशे सोळा तेवरी, माया जडली तव दासा वरि, आषाढ मासच्या द्वादशीवरी, केले त्वां पूर्ण प्रेम तीच खरि असे कृपा जना ॥ १ ॥

( केलीस असिकाय परीक्षा—या चा० )

लंपट बहु संभुराव जाहला खरा ॥ पहि नाटकि चेटकि मी करिन घाबरा ॥ धृ० ॥ युवति चरित दाविन परि वश न होई मी ॥ तात घात द्वेषि महा अतुडलें तमीं ॥ उगविन मी सूड स्वयें नाहिं कीं कमी ॥ कोशांतरी खड्ग जेंवि करिन सादरा ॥ लंपट० ॥ १ ॥ लाघव बहु दाउनियां हरिन चित्ततें ॥ मृदु भाषण सुरस करुनि हरिन वित्ततें ॥ शमविन मी हृदयींचें सकल चित्ततें ॥ नेत्र जालिं भूपमीन धरिन फारसा ॥ लंपट० ॥ २ ॥ लौकिक अजि सकल पहा सोडुनि दिला ॥ धर्म कर्म कांहिं नको दुष्ट माजला ॥ २ ॥ हरविन तत्तेज बघुनि त्यासि एकला ॥ सहवासें करिन नृपा जगतिं बावरा ॥ परिनाटकि चेटकि मी करिन घाबरा ॥ लंपट० ॥ ३ ॥

पद. ( माझ्या मनिंचें हित गुज—या चा० )

वश होईल कशि तुळशि चपळशी अतुरचि बहु जाहलों ॥ अध-

रामृत मी पान कराया या जगतीं सजलों ॥ धृ० ॥ जन्मांत-रिचें असेल संग्रहीं सुकृत तें कांहीं ॥ त्या योगानें कार्य होऊनी लाभें लवलाहीं ॥ वश० ॥ १ ॥ रामा श्यामा कमल लोचना पीनस्तनि पाहे ॥ मंदस्मित करि गल्ल प्रफुल्लित चंचळ बहु राहे ॥ वश०॥२ ॥ सालंकृत वपु गजगति चाले आभरणें हालतीं ॥ वक्रभ्रुकुटिया भाल विशालीं कुंकुम टीकलीती ॥ ३ ॥ तन मन धन हें अर्पण करितों मागे जरि प्राणा ॥ तरी द्याव-या सिद्ध शंभु हा नकरी अनमाना ॥ वश० ॥ ४ ॥

पद. ( शारदे दासकामदे—या चालीवर. )

सुंदरी चलग मंदिरीं रोष अंतरीं कदा नच करी विनवी मी साचे ॥ मसि बोल सखे अज सुस्वर मधुकर वाचे ॥ धृ० ॥ रूप दिसे तुझें बहु मोल हसुनि अज बोल वचन हे फोल सखे नच मानी ॥ मी कृतार्थ मानिन तुजसी आलिंगोनी॥सुंदरी ०॥१॥

पद. ( वसंती बघुनि मेलकेला० )

बघुनि तव आनन सुधांशुला ॥ मोह जाहला मनीं परी स्मर ज्ञाळी या तनुला ॥ सुचेना राज्यकाराला ॥ अन्नोदक ना रुचे सदोदित ध्यास तुझा धरिला ॥ केतकी भुजंग जणुं रमला ॥ किंवा चुंबकमणि लोहाचा संगम गे घडला ॥ तसें कधीं देशील सौख्याला ॥ मरणोन्मुख गती झाली पाजी अधरामृत मजला ॥ १ ॥

साकी.

उभय प्रीतही साम्य पाहुनि तोष मनीं बहु झाला ॥वृद्धपणीं मज सुखवा आतां भोगुनियां सौख्याला ॥ उदरीं सुत नाहीं। यास्तव दुखित नरदेहीं ॥ १ ॥

पद. ( चाल—ठाऊक मजला आहे ऋषीचें० )

वसंत कुसुमाकरा रती मी कर ग्रहणा साजिरी ॥ चंद्रासह जणूं कला तशी मी शोभेन अंकावरी ॥ पुरला मनिंचा हेत गोड करीं शेवट या उपरी ॥ गुप्तपणा हा त्यजुनि उघडपणें

क्रीडूं सुख मंदिरीं ॥ गुरुसदनीं या हरयत्नें हीं अबला धरावी करीं ॥ पदकमलीं लीन झालें पाळा अर्धांगी सुंदरी ॥ प्राणांतापर्यंत रक्षिन धनलोभी द्रव्यापरी ॥ प्राण दान हे दिलें त्यागा सत्य कल्प वैखरी ॥

कामदा.

फार तूमची पद्यकल्पना ॥ अल्हाद होतसे माझिया मना ॥ भीति व्यर्थ कां उगिच सेविता ॥ स्वस्थमानसीं सुरु करा अतां ॥

पद. ( तुजवरून काया ओंवाळूं कीं० )

स्मर मना विधि हरिहरा समज धर जरा नको पडूं ख्यालीं ॥ जलतरंग तैसे संग ढंग हे अंतिं कोणि ना वाली ॥ धृ० ॥ बहु कष्ट असति जीवासी लक्ष चौऱ्याशी योनी फिरला ॥ आधिं होतें थोडके पुण्य ह्मणुन या नरदेहाशीं आला ॥ नव मास जननि उदरांत मैलरक्तांत सोहं शब्दांत स्तवी देवाला॥ उदरांतुनि बाहेर पडे कोहं रडे भुलुनि मायेला ॥ शिशुरूप जाइ क्रीडेंत तरुण विषयांत भुले वृद्धांत सुत स्त्रीधनाला ॥ नाहीं ईशस्मरण कसें होईल तरण यम हरण करी प्राणाला ॥यातना बहुत यमपुरीं ह्मणुन स्मर हरी दया तो करी प्रभू वनमाळी ॥ जल० ॥ १ ॥

पद.

हार मिली हाय हमे हार मिली हार। घरभी मिली हार हमें द्वार मिली हार ॥ ख्वार रहे ख्वार रहे ख्वार रहे ख्वार। घरभी सदा ख्वार रहे द्वार रहे ख्वार ॥ फुलफे फुलेथे मिला उसकी बदल ख्वार। जितपे दोडे थे मिला उसकी यवज हार ॥

पद. ( चाल—कवणें तुज गांजियलें० )

हा दुष्टा पंचशरा, सोडिलें न या ॥ हत्या ही घोर तुवां केलि कासया ॥ धृ० ॥ रे चंद्रा पापराशी ॥ निर्लज्जा तृप्त होसि ॥ हे दक्षिणवायो अशि ॥ वेळ साधलीस कशी ॥ मारुनि मम मित्रासी ॥ लाभ काय सांग तुजसि ॥ तूंहि महाश्वेते, किती असशि निर्दया ॥ १ ॥

पद.

जहांनके बशर बने मुनशी, धरती सारी बने सख्ती. जमके दरीया बने सीयाही, तोरी नवाजिरा लीखी न जाये पुरन आस भई–जहां० ॥

पद.

लो चोरी खुली तुह्मारी देवसवारी करके न्यारी बाग बाडी लुटी सारी परस्तानकी दुलारी– तुम जुआरी बडे लबारी संग तुह्मारे दीलबर प्यारी खेल बाजी हारी खेल पीशेमानथी बेचारी॥ बदकारी झुनी न्यारी संग सीधारी देवन प्यारी दीलके; शीरों- में नतारी देव जान तलकी कुआरी–लो० ॥ चोरनको ताज कयेसा जुआरीको राज कयेसा वदीके चलनबीच झुटी सरदा- री–लो०॥चोर तो हो तुम पुरे पुरे आंख चुराकर परीयां धुरें ॥ माल चुराकर हाथमें लाये फुल चुराकर घरको आये ॥

दिंडी.

तात समजा गुरुवर्य शुक्र माझा ॥ आलों येथें जलकेली अह्मी काजा ॥ माझी आतां विज्ञप्ति एक आहे ॥ मानसीं मी पति तुह्मां मानिला हे ॥

पृथ्वी छंद.

शिवोनि तुमच्या पदा कथिन मी तुह्मांला खरें ॥ न कांहीं मज यांतलें विदित सांगतों मी बरें ॥ न संशय असो तुह्मां न कपटी ह्मणाहो मला॥ ह्मणाल तरि सांगतों नियम देह हा हो मला ॥

पद. ( चाल–नोहे हा पवन जवन वारु० )

सज्ज करुनि चाप मदन येत माागुनी ॥ मार्ग दावि इंदु मला तम निवारुनी ॥ धृ० ॥ जरि चंचल पद चुकतें ॥प्रीति तया सांवरिते ॥ आग्रभागिं मन पळतें ॥ करुनि दूर शंकेतें ॥ उत्कं- ठा नेत पुढें धीर देउनी ॥ १ ॥

पद. ( चाल–निज मख रक्षाया० )

हृदयिं तिच्या होता, वास तुझारे, निशिदीनिं गुणवंता, वास

तुझारे ॥ ह्मणुनि तुला मी हृद्गत पुसितों, कथुनि निवारीं मान सचिंता ॥ १ ॥ कांहिं दया माया, हृदयिं असे का, आश्रय तो न्याया, हृदयिं असे का ॥ कीं वज्राच्या काठिण्यानें व्यापियलें सुंदरीच्या हृदया ॥ २ ॥ इच्छा उद्भवली, काम सुखाची आशा अनुसरली ॥ होइल ती फलदायक किंवा सांग निराशा लिहिलों भाळीं ॥ ३ ॥

पद. ( राग कानडा, ताल त्रिवट. )

सांहूं किती या यातना ॥ काम जाळि तनुकानना ॥ धृ० ॥ त्रिभुवन भासे शून्यचि मजला ॥ सफल होय कधिं कामना ॥ सा० ॥ १ ॥ तव मूर्ति मम हृदयीं बैसुनि ॥ व्यक्त करी मनरंजना ॥ सा० ॥ २ ॥

पद. ( चाल—चल उद्यां बघ जातें० )

दुजी नच उपमा ॥ पुरवीं मम इच्छित कामा ॥ धृ० ॥ प्रियेसह विनोद जो एकांतीं ॥ तया शृंगार ही संज्ञा देती ॥ होते आनंदें सुखें शांती ॥ मर्दुनि कामा ॥ मिळतां तुज ऐशी भामा ॥ दुजी० ॥ १ ॥

गाणें सत्यभामेचें.

सत्यभामा ह्मणे श्रीहरिला हो हरिला ॥ पारिजातक तिकडे नेला ॥ धृ० ॥ कोणि एके दिवशीं हो दिवशीं ॥ नारद गेले स्वर्गासी ॥ बैसले इंद्र सभेसी हो सभेसी ॥ इंद्रें पुसिलें नारदासी ॥ एक पुष्प दिलें कृष्णासी ॥ तें पुष्प घेउनी हातांत हो हातांत ॥ नारद आले द्वारकेंत ॥ रुक्मिणी घरीं देव बसला हो बसला ॥ पारि० ॥ १ ॥ नारद बोले ऐका वचन हो वचन ॥ गेलों होतों स्वर्गाकारण ॥ देखिलें अनुरूप सुमन हो सुमन ॥ आणिलें तुह्मां कारण ॥ गौरविली रुक्मिण हो रुक्मिण ॥ मस्तकीं घातलें जाण ॥ ह्मणे आनंद झाला हो झाला ॥ पारि० ॥ २ ॥ तिनिसांजा आले भामे घरीं गोविंद हो गोविंद ॥ तिणें कवाड केलें बंद ॥ हाक मारी आनंदकंद हो कंद ॥ आं-

तून बोलली क्रोधें ॥ तुह्मी जावें परतोनी हो परतोनी ॥ जावें तिच्या मनाला लागुनी ॥ जा तिशीं प्रीतीनें बोला हो बोला ॥ पा० ॥ ३ ॥ श्रीहरी ह्मणे उघड कवाड हो कवाड ॥ तुला गोष्ट सांगतों निवड ॥ तुझ्या मनीं भरलें वेड हो वेड ॥ तुझ्या द्वारीं लाविन झाड ॥ कसें आणिलें नकळे मजला हो मजला ॥ पारि० ॥ ४ ॥ भामेघरीं झाड ह्मणुनि रुक्मिणी रुसली हो रुसली ॥ पलंगावरी जाउनि बसली ॥ देवानें स-मजूत केलि हो केली ॥ आंगणांत पुष्पें पडली ॥ रुक्मिण मनीं हर्षलि हो हर्षली ॥ नारदानें मौज केली ॥ आनंद सर्वां झाला हो झाला ॥ पारिजातक० ॥ ५ ॥

अंजनीगीत.

माझा शालू येथेंच होता । तया भ्रमानें नेसूं जातां ॥ मत्ते दुष्टे ह्मणशी आतां । काय तुझा बहुमात ॥

पद. ( चाल-इस तन धनकी )

है तकदीर जागी तुमारी हमारी । बुलाती हये सबको वो प्यारी हमारी ॥है०॥ चलो जान चलनेका तैयार है हम । जो करती हो महेमानदारी हमारी ॥ है०

पद. ( चाल-कधीं नव्हे तो मान )

पायरी सोडुनि कां तूं वदसी । लाज न वाटे तुज ती कैशी ॥ इतका कां तूं तोरा करिशी । दुष्टे सुरयानी ॥ १ ॥

पद.

कांहां तुह्मारी दुपटीआ कांहां हमारी शाल । कांहां जरासी रुमलिआ कांहां बडा रुमाल । वहां तुम्हारी खीरद रद जाहां हमारा खीयाल ॥ कमरके सामने जुगनुका नुर हये कंगाल । अरीओ अंधीआरी नजर बनवा डाल, बदन मेरा चंदा चलन तेरा गंदा तेरे फंदेमें आये न बंदा जनम फिरवा डाल-अरी०

पद. ( चाल-वद जाऊं कु० )

सखि ऐक तुला सांगतें करीं हें कृत्य आज बाई । तूं करिशि

प्रेम कांहीं ॥ अग सखये ग ॥ अभिमन्यु प्राण साहवा बहि॥ श्वर कुठें शोध आई ॥ करीं गे फार घाई ॥ अग सखये ग ॥ नच तरी रचुन दे चिता हिला कष्ट नच सखि साही ॥ प्राण हा न शरिरीं राही ॥ अग सखये ग ॥

## सतार. अथवा हारमोनियमचे

### सप्तसुर.

प्रकार १. सा, री, ग, म, प, ध, नी, सा सुलट. सा, नी, ध, प, म, ग, रे, सा. उलट प्रकार २. सा ग, रे म, ग प, म ध, प नी, ध सा. सुलट सा ध, नी प, ध म, प ग, म रे, ग सा. उलट. प्रकार ३. सा रे ग, री ग म, ग म प, म प ध, प ध नी, ध नी सा, सुलट. सा नी ध, नी ध प, ध प म, प म ग, म ग रे, ग री सा. उलट प्रकार. ४ सा री, सा री ग, री ग, री ग म, ग म, ग म प, म प, म प ध, प ध, प ध नी, ध नी, ध नी सा. सुलट. सा नी, सा नी ध, नी ध, नी ध प, ध प, ध प म, प म, प म ग, म ग, म ग रे, ग री, ग री सा. उलट. प्रकार ५. सा री ग म, री ग म प, ग म प ध, म प ध नी, प ध नी सा. सुलट. सा नी ध प, नी ध प म, ध प म ग, प म ग री, म ग री सा. उलट प्रकार ६. सा रे सा, सा री ग री सा, सा री ग म ग री सा, सा री ग म प, म ग री सा, सा री ग म प ध, प म ग री सा, सा री ग म प ध नी, ध प म ग री सा, सा री ग म प ध नी, नी ध प म ग री सा.

आरती. ( चाल—बलसागर तुम्ही )

आरति ओंवाळितों जय जय दिगंबरा दत्ता ॥ मंदमती मी पातकी देवा तारीं मज आतां ॥ धृ० ॥ दंडकमंडलु हस्तीं शोभत तुझिया गुरुनाथा ॥ पापी जन हे बहु उद्धरले गूण तुझे गातां ॥ १ ॥ ध्यानीं आणुनि तुजला दत्ता रूप तुझें पाहतां॥

आनंदानें तल्लिन होतें मन माझें आतां ॥ २ ॥ दत्त दत्त हें वदनीं नित्यही नाम तुझें घेतां ॥ भवसागरिं तूं तारिशी त्यातें शरण तुला जातां ॥ ३ ॥ कृष्णातिरिंच्या कुवरपुरी तूं वसशी गुणवंता ॥ दर्शनमात्रें तरती प्राणी हरिशी भवचिंता ॥ ४ ॥ इच्छा मनिंची पूर्ण करिशी बा तूंची गुरुदत्ता ॥ हरितव चरणीं लीन सर्वदा रक्षीं गुरुनाथा ॥ ५ ॥

पद. ( चाल—जाई परतोनी० )

छळसि किती मजसी दैवा ॥ छ० ॥ सिंहलेश नृपतनया प्रिय मी, बनलें बंदिक अशी ॥ दैवा० ॥ धृ० ॥ अहा विधात्या निर्मुनि अंतीं दुःख सागरीं लोटिशी ॥ परवशताही जाळी तनुशी, माझ्या दिवस निशीं ॥ दै० ॥ १ ॥

साकी.

चिंता होती मानसीं बहु परि शेवट गोडचि झाला ॥ मृत्यु मुखांतुनी सोडविण्या मशीं त्राता कैसा आला ॥ आतां भय नुरलें । दुर्दिन सर्वहि ते गेले ॥ १ ॥

श्लोक.

अंधःकारा पसरिति जसे मेघ पर्जन्य काळीं ॥ सौदामिनी क्षुभित गगनीं थोर वित्तास जाळी ॥ क्रोधांधासी सरळ न कदा मार्ग दिसे कुकाळीं ॥ निर्दाळी हा मतिहिन तसा सर्व आशा समूळीं ॥ १ ॥

पद. ( चाल-गुलनार मोतियां )

लावुनी परिस लोहाला ॥ निष्पन्न करी हेमाला ॥ सुममधु असे मधुपाला ॥ योग्य नसे उरगाला ॥ मग लावी रती कामाला ॥ रमवाया या कामाला ॥ चाल ॥ स्मर भार वपू दुर्गाला ॥ भेदील घालुनी घाला ॥ संभाळ बरें कामाला ॥ छातींत ॥ मारुनी लाथ । करिल हा घात । मनस्तंभाला ॥ बांधुनी टाक तूं याला ॥ १ ॥

अंजनीगीत.

करीं धरूनी आदर्शातें ॥ प्रेमयुक्त ती पाहे त्यांतें ॥ चित्र माझें तें सत्यचि गमतें ॥ शंका नच साची ॥ १ ॥

पद.

वदनचंद्र तव असुनि अन्य हा चंद्र उदय कां पावतसे ॥ दर्शन होतां मीनकेतुसी भरती काय न येत असे ॥ ध्रु० ॥ अथवा नयना तोष न देतो खरें काय तें कळत नसे ॥ जरी वदावें शीतांशूसी सुधारसाचा गर्व असे ॥ तरी जिवलगे सत्य सांगतों तव अधरींही ऊन नसे ॥
सागरिका तव हृदयीं भरली ॥ ह्मणून कां ही धुंदी चढली ॥
सागरिकामय सृष्टी सगळी ॥ परि नोहे ही तिच आली ॥
अपराध इथें न च गुणसरितें ॥ रूप तुझ्यासम भूप पाहुनि लोलुप झाला प्रेमरसें ॥
प्रिये तव दास, असे हा खास, क्षमा करि यास, दुजी न च आस ॥ प्रिये त० ॥
कपटपटो हे शब्द ऐकतां अंग तप्तता धरीतसे ॥ प्रिये प्रिये वद तिकडे जाउनि प्रिया तुझी मी आज नसें ॥
वच कंटक हे लंपटासि या साहतील सुंदरी कसे ॥ खरवाक्शर हाणिसी तरी ही प्रिया न तुजविण अन्य नसे ॥
पुरे पुरे हि तुमची स्तुती ॥ मज आली आज समजुनि ती ॥
दाखवा मजा ही पुरती ॥ त्या नव प्रियेच्या पुढती ॥ असे कपटिखरी ॥ नर जाति पुरी ॥
शपथ नसे मानिं कपट प्रियेगे व्यर्थ वदसि तूं मजसि असें ॥
तुजसि हे प्राण, अर्पिले जाण, नसे मज आण, तुझ्याविण त्राण ॥ १ ॥

आरती. ( चाल–लोपविली बहुत. )

दाशरथा रामचंद्रा कौसल्या प्रियसुता ॥ ओंवाळूं प्रेमभावें जगताचा तूं पिता ॥ ध्रु० ॥ भक्तांतें तोषवाया अवतरसी रघु-

वरा ॥ प्रेमानें पूजिती जे वर देसी त्यां नरां ॥ घेतांची नाम तूझें सुख झालें शंकरा ॥ संकटीं तूं धांव घेईं विनवीतों अच्युता ॥ १ ॥ दशवदना मर्दुनीयां सोडविलें सुरवरां ॥घेउनियां जानकीला आलासी निजपुरा ॥ तोषवुनी सर्व लोकां बोळविलें वानरां ॥ प्रार्थितसे दत्त दास लावीं या सत्पंथा ॥ २ ॥

ठुंबरी ( राग–झिंझोटी. ग. पंजाबी. )

पिया प्यारे इतनी अरज मेरी मान ॥ तोरे दरसनके अरमान जवान ॥ अ० ॥ दया किसन एक साच कहत है ॥ मतकर मान गुमान ॥

ठुंबरी. ( राग–झिंझोटी. ग. पंजाबी. )

मेरे पिया नहीं आये मैं कैसें करूं ॥ मेरे० ॥ जबसे गये मेरी सुद हुन लीनीरे ॥ किन सौत संग बिलमायेरे ॥

लावणी. ( राग–ललत. ताल--धुमाळी. )

कोणी घ्यागे मुरली करींची ॥ धृ० ॥ ऐकुनियां श्रवणिं मुरली ॥ भ्रांती नाहीं मनीं उरली ॥ नादा प्रीय वृत्ति तंव हरली ॥ वाजवी माधव परोपरीची, कोणी घ्या० ॥ १ ॥ दुसरी ह्मणे पहा श्रीहरि तो ॥ येऊनि आह्माला धरितो ॥ नानापरी छळणा करितो ॥ वाईट खोड हरीची ॥ को० ॥ २ ॥ तिसरी ह्मणे पुरे ही वस्ती ॥ सोसावा किती बदमस्ती ॥ हरी करी हा धिंगामस्ती ॥ फाडली कंचुकी जरीची ॥ ३ ॥ चवथी ह्मणे यशोदेसी बाई॥ कृष्णाला शिकीव कांहीं ॥ होनाजी बाळा गुण गाई ॥ करि काशी भक्ति हरीची ॥ कोणी घ्यागे मुरली करींची ॥ ४ ॥

पद. ( राग मालकंस ताल दादरा )

तारिं तारिं तारिं मला पुरुषपुंगवा ॥ तुजविण नच साह्यकारि अन्य येधवां ॥ धृ० ॥ इंदुपरी रम्य मूर्ति ॥ पूर्ण ताप संहर्ती ॥ पाहुनियां येत चित्तीं ॥ धन्यता जिवा ॥ ता० ॥ १ ॥ हीन दीन भूवरती ॥ तडफडते त्या न मिती ॥ साह्यकारि तूंच अंतीं ॥ हे कृपार्णवा ॥ ता० ॥ २ ॥

पद. ( राग भैरवी, ताल दीपचंद. )

काय करूं सखे चैन पडेना ॥ प्राणप्रियाविण मजला गमेना ॥ ॥ धृ० ॥ निद्रा कशी ही वैरीण झाली ॥ चक्रवाकीपरी विरह साहिना ॥ १ ॥ जातील मत्प्राण खचितची वाटे ॥ कामानळ जाळी तनूसदना ॥ २ ॥ गेलें जरी मी येथुनि आतां॥ कैसें मम वृत्त समजे त्यांना ॥ ३ ॥

ओंवी.

पहा, पहा तव ही स्थिती ॥ सुळीं देईल तो मंदमती ॥ जावें लागेल तुजप्रती ॥ क्षणीं यमसदनीं ॥ १ ॥

पद.

विशाल भालीं तिलक लावी हा शोभे नभीं चांदणी ॥ भ्रुकुटी देखुनी वाटे मदनचि ओढी धनू आकर्णी ॥ हरिणाक्षी ती असुनी मनोहर आहे चंद्राननी ॥ चक्रवाक पक्ष्यांचा जोडा वाटे बसला उरीं ॥ सिंहकटी तशी पृथूनितंबिनी आहे ती तरुणी॥ काय विधीनें खर्चुनी ज्ञाना रचिली मग ती मनीं ॥ १ ॥

लावणी. ( चाल—दिलचमनमें. )

आज खेळगड्यानो खेळ खेळूं विपिनीं या ॥ आरोग्यजनक विश्रांति जिवा या द्याया ॥ धृ० ॥ गुण चढउनियां ठेवितां सदां चापाला ॥ गुणहीन होतसे मात विदित जगताला ॥ सतत अभ्यासें येई क्षीणता मतिला ॥ यासाठीं जरा विश्रांति हितावह तिला॥या खेळ मांडूं घरीं वेळ होतसे जाया॥आरो० ॥

पद. ( चाल—झाली कोपानें० )

गार अशा या लतामंडपीं स्फटिकशिलेवरि हा बसला ॥ केवळ भासे चित्र कोरिलें समाधिस्थ कीं निजलेला ॥ १ ॥ निश्चल दिसतो जरि बाहेरीं शीलापासूनि बहु चळला ॥ शून्यहृदय वर कांतीं वाटे मानसिं चिंती दयितेला ॥ २ ॥ बोलेना तरि सांगे स्थिती ही आंतिल दुःसह पीडेला ॥ उरःस्थळावरि हार धरोनी गाळितसे किती अश्रुजला ॥ ३ ॥

पद. ( चाल–चित्तचोर तोचि रुचिर० )

महायत्न करुनी प्रिया लाभली करीं ॥ परि न तिला प्रेमभरें पाहिली पुरी ॥ सौख्यखनी रत्नावलि सुमति सुंदरी ॥ नघालितां गळ्यांत तिला फेंकिली दुरी ॥ म० ॥ १ ॥

पद. ( चाल--नृपाल कोप शांतवीन० )

मातृदेवता पुन्हां कधीं तरीं ॥ दृष्टिला पडेल कां जगांतरीं ॥ प्राण-हनन । करिति अदय नयन पाहुनी ॥ अरे खला कली तुझ्या दयारे नाहीं हृदयिं तिळभरी ॥ १ ॥

पद.

बस्स कर ढोंग्या गोष्टी साऱ्या पुरे करीं ह्या ज्ञानाच्या ॥ साधुपणाचा बहाणा दाविसि खाशिल वहाणा पायींच्या ॥ मोठा शहाणा मुलगा दिसतो जैसा सोलाणा ॥ अक्कल जाउनी नक्कल याची झाली शक्कल खरि जाणा ॥ आई बाप ते चिरंजिवाच्या नांवें करिति ठणाणा ॥ उपदेशामृत फेंकुन देउन सुखें घालिती धींगाणा ॥ १ ॥

आरती. ( चाल--पंडुकुमारा. )

आरति करितों गणपति देवा, दे मज मति आतां ॥ सर्व संकटें हरिसी सत्वर, गूण तुझे गातां ॥ धृ० ॥ पार्वतितनया विघ्ननाशका, तारिसि तूं भक्तां ॥ उद्धरले जड मूढ सर्व हे, नाम तुझें गातां ॥ १ ॥ नित्य निरंतर भजतां येईल, निजपद तें हातां ॥ ह्मणुनी चरणीं लीन सदा हरि, तल्लिन तुज पहातां ॥ २ ॥

पद. ( चाल–पंचतुंड नररुंड० )

प्रिये करितां जरी मरणही आलें नाहीं खेदचि मज त्याचा ॥ दुःखातुनि या सुटेन ह्मणुनि हर्ष न मानी मन्मनिंचा ॥ परि वाटे जें दुःख मनाला तारुण्याचा भरसाचा ॥ लेशही नाहीं मुळींच मजला जगांतील ह्या सौख्याचा ॥ निरापराधी असा असोनी त्राता नाहीं मज साचा ॥ जगदीशा मी तुजला स्मरुनी निश्चय करितों मरण्याचा ॥ प्रिये० ॥ १ ॥

पद. ( चाल—फुलें वेलीचीं० )

कटीं लंगोटा ॥ घेउनी भीकेचा लोटा ॥ धृ० ॥ असेल भूवरी भडकत आतां ॥ किती करावी त्याची चिंता ॥ दम धरवेना किमपी चित्ता ॥ असे कीं मोठा ॥ स्त्रीजन्म जगीं या खोटा ॥१

पद. ( चाल—मना तळमळशी० )

सखे तव प्रीती ॥ खरिच कीं असे मजवरतीं॥क्रिया सुचवीती ॥ धृ० ॥ मम हृदयीं उत्सुकता उपजे ॥ त्यजुनि सौख्य नृपरीती ॥ सखे० ॥ १ ॥ वनउपवनीं नगीं फिरतां शिणलों ॥ धरुनि आस तव चित्तीं ॥ स० ॥ २ ॥ चिंतानल अजी शांत जाहला ॥ श्रवण करूं दृढ नीती ॥ सखे० ॥ ३ ॥

पद. ( राग ललित ताल त्रिवट )

पाजी अधर सुधेला ॥ मरणोन्मुख हा झाला ॥ धृ० ॥ योगी नव्हे मी चंद्रकांत नृप ॥ विरहें शुष्क तनूला ॥ पा० ॥ १ ॥ स्वल्प कल्प त्यज देईं आलिंगन ॥ सुफलित यत्न जाहला ॥ पा० ॥ २ ॥

पद. ( रसियाचे० या चा० )

रतिविलास गंगे माझारीं ॥ करि विहार नौकानारी ॥ किती असें सुनिर्मल वारी ॥ जलविहार करी सुखकारी॥ सुख विलास भोगुन मंदिरीं ॥ घे मजा तवांकित नारी ॥ १ ॥

पद. ( चाल—कायमला भूल पडली० )

जगतीं प्रती दावीतसे गजगती ॥ चपलाक्षी या चपला हृदय भेदिसी ॥ धृ० ॥ कुंदरदन चंद्रवदन राग पूर्ण ते । नेत्र बाण पाहुनियां चित्त रंगतें ॥ घोर तुपा आचरलों येउनी इथें । फळ त्याचें जायाही होय जरि वनीं ॥ जगतीं० ॥ १ ॥

पद. ( चाल— रामचंद्र नाहिं घरीं काय मी करूं )

अग्नि जाण हा प्रचंड अतनु पेटतो ॥ ज्वाला जरि नसती तया, देह जाळितो ॥ धृ० ॥ धूम्ररहित असुनि पहा अश्रु गळवितो ॥ नसुनि भस्म धवल करी निजवशासि तो ॥ चाल ॥ त्रिभुवनिं युक्तापयुक्त कुणि न नांदतो ॥ १ ॥

पद. चाल–देवस्त्री मेनका(अप्सरा० )

कादंबरिची तशी प्रतिज्ञा स्मरतां मज गमते ॥ आली तैसें जावें लागे परतुनि नगरातें ॥ १ ॥ स्वभाव सखिचा किंचित मानी वदली हंससुता ॥ यावरूनी तरि तिळहि न जागा आशेला ॥ आतां ॥ २ ॥ त्यांत सूता ती गंधर्वाची मानव मी कोठें ॥ आशा धरिली प्रथम हेंच हो मौर्ख्य होय मोठें ॥ ३ ॥

साकी.

गत जन्मीं तीं पापें करुनी आली कुदशा ऐसी ॥ इह जन्मीं त्या विसरुनि ईशा होइल मग गति कैशी ॥ ह्मणुनी मज वाटे । स्मरावें नित्यचि बा त्यातें ॥ १ ॥

पद. ( चाल–मज शेवटची आशा० )

बाळा सकुमारा थांब जरा मी आल्यें ॥ दुःखानें बघ आहाळलें ॥ धृ० ॥ टाकुनि कां जाशी एकटि ह्या जननीतें ॥ पाहुं कुठें प्राणपतीतें ॥ चाल ॥ जीव वणव्यानें घाबरला ॥ रे जीव० ॥ मीं जाऊं कुठें या समयाला ॥ रेमी० ॥ चाल ॥ हा भगवंता काय तुझ्या सेवेनिं चुकलें ॥ ह्मणुनी हें विपरीत घडलें ॥ १ ॥

पद. ( चाल–गुरु दत्त निरंजन० )

क्या मधुर रूप है उनका ॥ लेजावे टुकडा मनका ॥ धृ० ॥ बाल चोलके भांग बनाया जैसी गिरिपर गंगा ॥ देखतेहि दो जोबन उनके करे रति पति दंगा ॥ १ ॥ सांडि पेनके चोली डारी म.रे नथनी झोंका ॥ लगबग धीर सब पलट गया है हुवा टुकडा तनका ॥ २ ॥

पद. ( चाल–ब्राह्मण कन्या नव्हे क्षत्रिया )

ती भीमाची वार्ता परिसुनि धर्मराज तळमळी ॥ जशी कां जिवनाविण मासळी ॥ धृ० ॥ हा वत्सा हा तात भीमा काय गती जाहली ॥ शत्रुनें कशी वेळ साधिली ॥ आह्मीं सर्वांनीं ही आशा तुजवरती ठेविली ॥ असती कां तू आमुची सांब-

ली ॥ आह्माकरितां वनांत दुःखें फार तुवां भोगिलीं ॥ आ-मुचीं दुर्वचनें सोशिलीं ॥ चाल ॥ कां आह्मां सोडुनि जावेसें वाटलें ॥ कीं पहिल्याहुनि बा दुःख अधिक दाटलें ॥ कीं आ-मुच्या वरचें प्रेम मनीं काढलें ॥ यास्तव कोणा पुसल्या वांचु-नी गेलासी स्वस्थळीं ॥ टाकुनी आह्मांतें भूतळीं ॥ तीभी० ॥ मी भ्रात्याला संहाराया मूर्त काळ जाहलों ॥ करंटा कशास मीं जन्मलों ॥ मातेच्या मी गर्भापासुनि कां न पतन पाव-लों ॥ कशाला दीर्घकाळ वांचलों ॥ तसाच कां मी वनांत नाहीं तपा करुनि राहिलों ॥ कशाला मोहीं या गुंतलों ॥ चाल ॥ राज्य सुखाची धरिली आशा मनीं ॥ म्यां दायदाशीं वैर बां-धिलें जनीं ॥ त्यांनीं मज कां नाहीं वधिलें वनीं ॥ कां म्यां मूढें नाहीं उपडिली वैर तरूची मुळी ॥ कशाला जाता भ्राता बळी ॥ तीभी० ॥ १ ॥

पद. चाल—कान्हा बनसिवालेनें० )

काशि क्षेत्रवासी जन हो कुणि कृपा करा ॥ धृ० ॥ भार हेम देउनि घ्यावी माझि सुंदरा ॥ मुक्त होउ जेणें आह्मीं विनती मानिं धरा ॥ १ ॥

पद. ( चाल—काय मला भूल पडली. )

थाट माट चकचकाट भूषणें करीं ॥ येत असे ह्या स्थलासि कांचनी खरी ॥ धृ० ॥ सुमन चाप धरुनि कसुनि मारि अंत-रीं ॥ असुनि सुमन सुमनांचें धैर्य संहरीं ॥ मोहिल हीं वाटे ह्या जोगड्या खरी ॥ १ ॥

( पायघड्याच्या चालीवर. )

जगदंबा माय माझी ॥ सखेग ॥ करवीर वासिनी जी ॥ सखे ग ॥ ब्रह्मादिक जीस राजी ॥ स० ॥ नित्य तिजला मी ग पूजीं ॥ स० ॥ संकट समयीं पावो ती ॥ स्तुति करण्या नसे शक्ती ॥ स० ॥ १ ॥

पद. ( चाल—शेष शयन कमल नयन० )

वक्रतुंड कमलनयन विघ्नभयहरा ॥ सुरनरमुनी शरण स्तवि-

ती जोडुनी करा ॥ सर्व दुरित शांतीस्तव स्तवन श्रीवरा ॥ मत्कवनी रंग भरी दुःखनिधि हरा ॥ वक्र० ॥

पद. ( चाल-रुचति कां तिर्थ यात्रा० )

कारागृहवास माझा कधिं सुटेल श्रीहरी ॥ कधिं भेटेल प्रिया माझी कोमलांगी सुंदरी ॥ विरहदुःखें व्याकुल झालों फारच मी अंतरीं ॥ दिनानाथा भक्तपाला पाव मला सत्वरी ॥ १ ॥

साकी

चुकवुनी व्याधा तोडुनी जाळें टाळुनि दावाग्नीला ॥ हरिण त्वरें धांवुनियां जातां अवचित कूपीं पडला॥ऐसें मज होतां॥ करिन मी तत्क्षणिं प्राणांता ॥ १ ॥

पद. ( चाल-हृदय पहा काळजीनें० )

कतकिचा वास करी धुंद सदा नागिणीला ॥ सहवास करुनि सुखें घे पदरीं तूं मजला ॥ स्वाती घनजलबिंदू तृप्त करी चातकिला ॥ त्यापरी तूं शांतविंरे मनरमणा ही अबला ॥१॥

पद. ( चाल-वाडवडीलां सेवित जावें०)

भेटेल कधीं मज प्राण विसावा॥सुंदर मुखतें मजला दावा॥धृ०॥ निद्रा कशीही वैरिण झाली ॥ प्रिय कांताची भेट दुरावली ॥ काय करूं मज कांहीं सुचेना॥अन्नोदक आणि नरुचे शयना॥१

पद.

खुब तेरी बात अब मेरे समजमें पाई हए ॥ तू कमानाकि लीए चकसीर जो चकराई हए ॥ देर कारे नेकमें फीर कीस-लीए ठएराई हए ॥ खुदबखुद तेरे लीए घर बयेठे न्यांमत आहए॥

पद. ( चाल फुलें वेली. )

पतिची सत्ता ॥ तुजवरी असोनी लत्ता ॥ देसी ईशापरि त्याला आतां ॥ त्याहुनि पुढती मजला देता ॥ स्थिरता नसे युवती चित्ता ॥ रुचेल त्याला प्राण अर्पिता ॥ विसरुनि कांता ॥ सेविसी कशी तूं दुरिता ॥ १ ॥

पद. ( लावणीचे चालीवर. )

पातळ पुतळी चमकत नाचे अति चपला नभीं वीज जशी ॥

नर्तन गुरुला शिकवायाला योग्य असेही हवी तशी ॥ धृ० ॥ शिरीं कुरळ केशांचा बुचडा खुप करुनि बांधिला असे ॥ वेणि नव्हे हा भुजंग दुसरा ऐसे नयना भासतसे ॥ विशाळ विशाळ भाळा वरती केशर चिरी मनोहर शोभतसे ॥ जसा शरत्कालिंचा चंद्रमा पूर्णवदन भासतें तसें ॥ विशाळ डोळे ऐसी शोभा विमलां कमलांचिही नसे ॥ नाक कळी चाप्याची केवळ गाल गुलाबी फूल तसें ॥ कृष्ण तिलक गालावर शोभे भ्रमरी कमलावरी जसी ॥ आरकाधर पोंवळीं लालही न शोभती या पुढें तसीं ॥ पा० ॥ १ ॥ अंगीं कुंचुकी तंग असेही पीन स्तन उरीं चेंडु जसे ॥ फार सरळ भुज दंडही शोभती करीं हिऱ्याची मुदी असे ॥ वरती छाती विस्तृत खालीं हळु हळू बारीक होत असे ॥ कटी तटी अति सूक्ष्म जणूं मुठी माजि माईल अशी दिसे ॥ हुमजला पैठणी पालळ भर जरी नेसली कशी ॥ गुणनिपुणा जन्मा मधिं माझ्या नाहीं पाहिली नार अशी ॥ पा० ॥ २ ॥

लावणी.

ह्या चाकुरा, आणिले घरा, काय ही तऱ्हा, विचार न जरा मनामंधि केला ॥ लाविली आगही माझ्या संसाराला ॥ धृ० ॥ घर धुपून, रचोन नेऊन, अला घेऊन, चाकुरच असला ॥ कुनिकड गेली बुद ती झकमारायाला ॥ १ ॥

पद.

अंतरतिल हे पाय ॥ नाथा मज ॥ धृ० ॥ नसती झाले बहु दिन येउनी ॥ तो भलतें हें काय ॥ १ ॥ नाहींत पुरले सुख सोहाळे ॥ वाटे मानसिं हाय ॥ २ ॥

पद. ( चाल—काय मला भूल पडली० )

त्रिपुरांतक गिरिजाधव हे महेश्वरा ॥ जगदीश्वर गंधाधर इंदु-शेखरा ॥ धु० ॥ विनवितसे आजि विभो हस्त जोडुनी ॥ अज्ञान मारुनी ज्ञानदीप लावुनी ॥ दुस्तर ह्या पार पाडिं भवाब्धींतुनी ॥ कृष्ण तनयइच्छितसे हेंचि शंकरा॥ त्रि० ॥१॥

पद. ( चाल—राजाहू मैं कौमना )

अयोध्यापुरी भूप मी हरिश्चंद्र मम नाम ॥ फिरतों कर्मदशेनें डोंबाघरींहि मज काम ॥ धृ० ॥ कारण मृगया मिषतें त्यागाया धन धाम ॥ दावाग्निसी पाहतां येई त्रिवर्गा धाम ॥ १ ॥ भागिरथी तिरीं येउनी उभे ठाकलों ठाम ॥ देह विक्रया लावुनी मुख केले हें शाम ॥ २ ॥

कामदावृत्त.

एकलीं वनीं काय मीं करूं ॥ पाहुं मी कुठें पुत्र पांखरूं ॥ धांवुनी प्रभो तारिं तूं मला ॥ शोकवन्हिनें देह पोळला ॥ १ ॥

पद. ( चाल—वीरशिरोमणि सकलधनुर्धर० )

पंचरत्न स्मर गाळुनी विधिनें मूस जेविं ओतिली ॥ गौरतनू सुस्वरूपें शोभली ॥ कामी जनाचे हृद्भेदा भ्रुधनुवरि ज्या चढविली ॥ नयनशरें मम वृत्ती भुलविली ॥ चाल ॥ अधरीं मधु भाषणें लाज कोकिले प्रती ॥ मालती गुच्छा परि कुच रमणिय भासती ॥ सिंहाकृती ही रंभोरु गजगती ॥ उ० ॥ नवतारुण्यें व्याप्त चित्त तीं तत् स्वरुपीं गुंगला ॥ गौरतनू सुस्वरुपें शोभली ॥ पंचरत्न० ॥ १ ॥

पद. ( चाल—काय बेट्या हरिणाची मजा० )

सदना त्यागुनी विपिनीं रमतां सुख नच मज गमतें ॥ मित्रा ॥ प्रिय कांतेविण प्रिय ना वाटे दुजि रमणिय चरितें ॥ मित्रा कामनल करि तनुवन दग्धचि भाना हरिलें तें ॥ मित्रा ॥ खानपानादिक विष यासम भासे खचलें धैर्यची तें ॥ मित्रा ॥

अंजनीगीत.

सुंदर वस्तु मज वांचोनी । कधिं नच खाई लेइ भामिनी ॥ भेटी वांचुनी आडही रजनी । घालविली नाहीं ॥

पद. ( चाल—नोहे नारी ही चंचल वल्ली० )

स्तवितों दिनतारक लक्ष्मीकांता ॥ मज तारिं अनंता ॥ धांव धांव अहितल्पकीं शयना सुजनपालका ये धीमंता ॥ धृ० ॥

माय' कौतुक हे विलास करिशी ॥ स्त्री इच्छा धरीशी ॥ वृंदामाप्तिस्तव असुरहि नटशी ॥ तरी वनीं तपशी ॥ सेवे सादर श्री असुनी खाशी परवनिता वरिशी ॥ द्वैतभाव तव मानसीं कैसा विश्वाविण भी कां गुणवंता ॥ स्त० ॥ १ ॥

पद. ( चाल—धनलोभापुढती० )

अर्पितसे देह तुह्मां या समयीं ही युवती ॥ हीच खरी स्वकृतिची रिती असे या जगतीं ॥ तद्रूपकृती फेडुं बरें काय करोनी सुमती ॥ प्रिय दासी घ्या पदरीं करीत असे ही विनती ॥

पद ( भैरवी—झंपा. )

चंद्रमा रोहिणी संगमा पाहुनी ॥ ज्यापरी होतसे तोष नयनीं॥ तूंच हृदयंगमा अंगना या जनीं ॥ सत्य गमतेस गे सकल भुवनीं ॥ अनुदिनीं साझ तुज ठेवूनी ईश्वरा सुंदरिस ठेवितों हृदयभुवनीं ॥ १ ॥

पद. ( चाल—सुखोपभोगा० )

गृहिणी नससी संग्रहिणी तूं कुलटे कपटखानी ॥ प्राणावरती उलटुनि पडलिस अघटित तव करणी ॥ पुरे पुरे तव संगत आतां विटलों भी स्वमनीं ॥ उभय कुलांला डाग लाविला अक्षय तूं सुजनीं ॥ १ ॥

पद. ( चाल—कायबेव्या हरिणाची मजा० )

योग्य निजबला अबला कटिंबंधीं हेमकलश घेती पहाहो ॥ दहा पांचजणी नारी विहिरीं उदकास्तव जाती ॥ पहाहो ॥ ओढितां पाणि कंकणें विद्युत्सम दिसती ॥ पहाहो ॥ धर्म नीर वाहतां जणुं नीरें स्नाना आदरिती ॥ पहाहो ॥ आठव राहण्या निजाश्रमीं घट जल बिंदु त्यजिती ॥ पहाहो ॥ तेणें स्खलित जलरेखा पंक्ती सर्पाकृति दिसती ॥ पहाहो ॥

ठुंबरी.

थारो मनकां लागो बता सयां ॥ थारो० ॥ बारा बरस पीछे सयां मोरे आईलो ॥ तनकी तपत बुजा सइयां ॥ थारोमनकां ला० ॥

पद. ( चाल--व्यर्थ आह्मीं अबला० )

देत्यें निजमांसा ॥ यतिवर्या ॥ धृ० ॥ आवडेल त्या घा भागा ॥ पाक होय खासा ॥ १ ॥ नवनीतासम मम हृदया चा ॥ घ्या तुकडा परिसा ॥ २ ॥

ठुंबरी.

में भुलीनें हलाया निंबनें हलाया ॥ में० ॥ भुलीनें० ॥ राम नामका सुमरन करले ॥ भाषक नाम धराया निबेनें हला में भुलीनें हलाया० ॥

पद. ( चाल--साध्य नसेमुनि कन्या० )

बहु उपकारचि झाला बाई ॥ परि त्वन्मांसेच्छा मज नाहीं । ॥धृ०॥ भक्षुनियां मी तुजसम सतिसी॥फेडूं कोठें त्या पापासी॥ तूं वंद्य भुवनत्रयासी ॥ करुनी विचारा मानसिं पाहीं ॥ १ ॥

पद. ( चाल--झाली ज्याची उपवर० )

प्राणप्रिया मी अपुले सदनीं ॥ बहु पक्वानें ठेविलिं करुनी ॥ ॥ धृ०॥ लाडु घीवर भात केशरी ॥ वडे घारगे जिलब्या असूनी ॥ प्राण० ॥ खीर आंबटी मांडे शाखा ॥ क्षुधा शांतवा ती सेवोनी ॥ प्राण० ॥ १ ॥

ठुंबरी.

मैं भुली राजा नगर बतादीजोरे ॥ मैं भु० ॥ कबकी मैं भइ ठाढी अरज करूंहूं ॥ इतनी अरज मोरी मानबे राजा नगरमैं भुली० ॥

ठुंबरी.

भईली बदनामी मोरे समारे ॥ भईली० ॥ सासकी चोरा चोरीकर डारारें । नैनों बसगई रामारे ॥ भईली० ॥

पद. ( चाल--कधींग साळू बोलशील. )

सुदिन धन्य मानितों मी यत्न सिद्ध झाला ॥ सौख्यसिंधू मोदलहरी युक्त पूर्ण भरला ॥ धृ० ॥ आस मनीं ध्यास सदा राज्य सुख त्यजिलें ॥ साधूचा वेष परी बद्ध प्रीति झालें ॥

दर्शीत हा लेख हृदयीं मारी स्मरभाले ॥ ब्रह्म नेम न टळे कदा आजि योग घडला ॥ सु० ॥

पद. ( चाल—या उपवनींची सुंदर० )

सुंदर स्थल परी नच मनिं स्थिरता ॥ विरह स्त्रियेचा भ्रमवी चित्ता ॥ धृ० ॥ सुम तरु जेवीं कंटक रानीं ॥ नच सुखि निद्रा वन्हीं शयनीं ॥ जलाविण मीन कीं जेंवि कुमुदिनी ॥ क्रोधें स्मरशर योजी घाता ॥ सु० ॥ १ ॥

पद. ( चाल—नृपाल कोप शांत० )

अघोर पापिणी असे मीं खरी ॥ पाहिन कां सखा पुन्हां जगांतरीं ॥ त्यजुनि प्राण जगतिं धन्य व्हावया अजी ॥ इथें अशी हि पातलें ॥ परी या दैवें ॥ वेळ साधिली ॥ १ ॥

साकी.

मदनाग्नीच्या संतापानें शुष्क असे झालेलें ॥ तिच्या स्तनांचे मंडलसम वण दिसती इथें उठलेले ॥ स्तन विस्तार तिचा ॥ दाविती जणुं हे मज साचा ॥ १ ॥

## ग्रंथकर्त्याची ईश्वरस्तुती.

पद. ( चालः—मदनारि गौरी० )

रणधीर ॥ रामराया ॥ जानकि मनरमणा ॥ सुखकर ॥ दशकंधरकदना ॥ दे भजनीं सुमती ॥ प्रभु रूप तुझें ॥ मज दाउनी ॥ अविनाशी दे पद अंतीं ॥ प्रपंच मजला ॥ निष्फळ गमला ॥ अंत न लागे मायेचा ॥ रचुनि कवन सुमन हें ॥ चरणकमलिं तव ईशा ॥ अर्पुनि विनती करितसे ॥ सुप्रिय होवो सकलांला ॥ तारिं तारिं प्रभो सेवक किंकरा ॥ अन्य न आसरा ॥ सुखधामा ॥ श्रीरामा ॥ दे प्रेमा ॥ दुरितें ती ॥ सारि वारिं तारिं तारिं प्रभो० ॥ १ ॥

पद. ( चाल—मोरे सया करे चतुराईरे० )

माझ्या प्रिये पहा आंबराई ही ॥ जुई जाई चक्रवाकी छबु

चंबेली मोगरीही ॥ माझ्या ॥ ध्रु० ॥ आम्रतरुसि कशि आवळि माधवी ॥ नृत्य करी मोर बघुनि मयूरीही ॥ माझ्या० ॥

पद. ( चाल–सांब सुराभरणा )

सर्वसाक्षि हरिला नमितों जोडुनी करकमला ॥ भार भूमिचा हरण कराया यदुकुलिं जो मथुरीं अवतरला ॥ ध्रु० ॥ भक्त वृंदपाला सबला यदुकुल गोपाला ॥ भजुनी नास्य दावीं सकला हो साह्यचि झाला ॥ चाल ॥ शाम कवि हा त्वत्पद वंदुनी अर्पितसे वाक्पुष्पित माला ॥ १ ॥

लावणी. ( थट्टेची. )

अहो राव बरी नव्हे थट्टा ॥ आब्रुसी लागेल बट्टा मोडेल खट्टा ॥ ध्रु० ॥ रावणानें थट्टा केली ॥ रामाची सिता नेली ॥ कुळी बुडविली ॥ पापाचा केला वाटा ॥ १ ॥ थट्टा कीचकानें केली ॥ द्रौपदीवर नजर ठेविली ॥ देहाची माती केली ॥ मोडला कांटा ॥ २ ॥ त्रिवर्गें थट्टा केली ॥ अनुसयेचे गेले महालीं ॥ तिनें तीन बाळकें केली ॥ दिला चपाटा ॥ ॥ ३ ॥ इंद्रानें थट्टा केली ॥ आंगीं सहस्र भगें झालीं ॥ अहिल्या शिळा केली ॥ मारिला सोटा ॥ ४ ॥ नारदानें थट्टा केली ॥ देवाची स्त्री मागितली ॥ नारदाची नारदी झाली ॥ झाला बोभाटा ॥ ५ ॥ थट्टा केली विश्वामित्रानें ॥ दुःख भोगिलें हरिश्चंद्रानें ॥ नेत्र पुसी राणी पदरानें ॥ रोहिदास बेटा ॥ ६ ॥ थट्टा बाबूरंगेल गाई ॥ ही पहा बरी नाहीं ॥ थट्टे साठीं मोडे कांटा ॥ ७ ॥

पद. ( चाल–इसतन धनकी कोन बढाई )

स्मरतां निरंतर भावें हरिला ॥ काय ती करिल माया तुजला ॥ ध्रु० ॥ श्रवण करीतां पुराण कीर्तन ॥ होइल काया मनुजा पावन ॥ स्म० ॥ येतां संकट शीघ्र टळोनी ॥ काळहि जाइल दूरचि पळुनी ॥ स्म० ॥ दीन जनोद्धर दशरथ नंदन नित्य मनीं भज रघुविर चिंतुन ॥ स्म० ॥

पद. ( चाल–झाली ज्याची उपवर )

ह्या उपवनिंची सुरम्य छाया ॥ योग्य असे श्रम दूर कराया ॥ ध्रु० ॥ शुक कोकिल खग सुस्वर गाती ॥ शांतविती किती भक्त मना या ॥ १ ॥ कारंजाचे तुषार उठूनी ॥ मिळति पुष्प गंधित पवनीं या ॥ २ ॥

होरी. ( राग–काफी–ताल–दीपचंदी )

मारिसि कां पिचकारी ॥ माझी भिजली साडी सारी ॥ ध्रु० ॥ नाहीं असें मी परकीय नारी ॥ धाक सासुचा भारी ॥ अडवूं नको तूं व्यर्थरे थंढा ॥ नवऱ्याची मज चोरी ॥ पुरे बळजोरी ॥ १ ॥

( लावणी आगगाडीची )

इंग्रजी सीमा झाली ॥ त्यानें आगगाडी केली ॥ ती नव्हती कोणी पाहिली ॥ लागली गोडी ॥ अहो राव चालती गाडी ॥ मन पवन लाविल्या ओठी ॥ आत्माराम त्यांत खडाडी ॥ चालवी गाडी ॥ १ ॥ देहींची ऐका मात ॥ ईश्वरी करणी अघटीत ॥ त्यानें ठेविले सर्व मुठींत ॥ कळा नऊ नागी ॥२॥ तनु कायेची गाडी केली ॥ नऊ नाड्यानें बंध बांधिली ॥ तीनशें साठ सांदे जडले ॥ असले तर पाही ॥ ३ ॥ काम, क्रोध, मदमत्सर ॥ कळा तोडिल्या दंभ अहंकार ॥ प्रपंच लागला जो रगडी धडधडी ॥ ४ ॥ सात धातूंचा कणा केला ॥ चार चक्रें लाविली त्याला ॥ नयनाचा प्रकाश केला ॥ सडक केवडी ॥ ५ ॥ पंचतत्वाचे विंझण करुनी ॥ जठराग्नी आंत भरूनी ॥ वायू भाता जो लावुनी ॥ उस्वास काठी ॥६॥ जिला बावन डबे करून ॥नऊ दरवाजे खिडकी लावून॥दहा अवतार त्यांत बसवून ॥ हांकारिली गाडी ॥ ७ ॥ यमाचे हातीं जी लावून ॥ दिली जन्म पत्रिका तिकिट काढून ॥ तेव्हां गाडी मधीं बसवून ॥ केली तांतडी ॥ ८ ॥ ही गाडी पंच प्राण ॥ करी सदां हरीचें ध्यान ॥ गायी बाबू रंगेला आत्मज्ञान ॥ साटे झोडी ॥ ९ ॥

पद. ( चाल–उद्धवा शांतवन कर जा. )

दुःशासन बालक माझें ॥ मज टाकुनि कोठें गेलें ॥ धृ० ॥ ये वत्सा लवकर मातें ॥ कमलाक्षा दावीं वदना ॥ भागलास असशिल भारी ॥ बा करितां अरिच्या कदना ॥ घेऊनियां स्कंधीं तुजला ॥ नेतों मी निजसुख सदनां ॥ चाल ॥ करितां तूं समरविहार ॥ लागली भूक तुज फार ॥ झालासि तृषित फार॥ कोठें त्वां जाणें केलें ॥ दुःशा०॥संकोचें कांहीं वस्तु मागितलें नाहीं मजला ॥ भोगाया विलास नाहीं ॥ दिधली मी आज्ञा तुजला ॥ मज साठीं सर्व प्रकारें ॥ भोगाया दुःखा सजला ॥ ॥ चाल ॥ तें माझें प्रियकर मोठें ॥ मज टाकुनि गेलें कोठें दैवची बा माझें खोटें ॥ कैसें हें विधिनें केलें ॥दुःशा०॥ तूं माझ्या अध्यीं वचनीं ॥ वर्तलासि झालें फोल ॥ ताताहुनि ममता भारी ॥ मजवरि तूं असली लोल ॥ मांडिवरी बैसुनि मज सीं ॥ एखादा सुशब्द बोल ॥ चाल॥ मज करितां पांडव वैर ॥ केलें त्वां पुरतें स्वैर ॥ नाहीं तरि ऐसें गैर ॥ नसतें त्या दुष्टें केलें ॥ दुःशा० ॥

पद. ( चाल–सकुमार असुनि तूं फार० )

अभिमन्यु असुनियां बाळ, कायही ख्याती ॥ कुरु वीर त्यांसी तो काळ, वाटला चित्तीं ॥ १ ॥ लहु कुश पाडुनियां वनीं, वाल्मिका हातीं ॥ रामासि जिंकिले त्यांणीं, कवि हे गाती ॥ ॥ २ ॥ शालिवान जरी कुल्लाळ गाजवी कीर्ती ॥ राजाधिराज ही पदवी मेळवी पुर्ती ॥ ३ ॥

ठुंबरी. ( राग–पिलु. ग. पंजाबी. )

घागर्या फोरिरे काना बनसी वालेने ॥ घागर्या फोरिरे ॥ अंतरा ॥ मटकी माती गुजर गइ पानी भरन चली ॥ बिचमें मिला शाम कनैया भया मरोरिरे ॥ १ ॥

लावणी. ( राग-पिलु-जिल्हा ताल त्रिवट. )

कशि केलिस मजवर मातरे ॥ कपट करून तूं आजि सजणा ॥

॥ कशी० ॥ घृ० ॥ डावा माजी माहेक गोष्टी बोलुन जिंकीशी पैजरे ॥ अबला हृदया जाणुनी तूं मनीं वदना लाविशी हातरे ॥ १ ॥

पद. ( राग कालंगडा ता. दादरा. )

सखया दुर्दैवा किति तूं छळिसी मला ॥ सखया ॥ घृ० ॥ शुष्क तरु बाजीर्ण गृहापरि ॥ मानिति जन मजला ॥ पहा हे मानिति जन मजला ॥ सखया० ॥ इष्टमित्र मज अवमानिति बहू ॥ होतें दुःख मनाला ॥ अहारे होतें दुःख मनाला॥ अजुनिही कां नये दया तुजला ॥ स० ॥

पद. ( चाल—रामासी अनुकूल असता. )

भंगुनि मूर्तै भवानीची टाकी, चिरडीन त्यास तरीच मराठा ॥ घृ० ॥ गोमाता वध केला त्यासचि, मारीन खास तरीच मराठा ॥ अफजुल्या तव सेना सर्वही, खपविन जाण तरीच मराठा ॥ हिंदू द्वेष्ट्या सूढ याचा मी, घेईन साच तरीच मराठा ॥ १ ॥ वैदिक धर्मा छळते तुझां, शासिन जाण तरीच मराठा ॥ रट्टा देऊन राखिन बाजू, शिवराजाची तरीच मराठा ॥ भंगुनि वचना वंचन केलें, फेडिन उसनें तरीच मराठा ॥ बाला अबलां वधिलें त्यांचा, घेईन बदला तरीच मराठा ॥ २ ॥

ठुंबरी.

चलत पवन है सननन सावन ऊम झुम ऊम झुम छुम कामना ॥ घृ० ॥ ताल तंबूरा मृदंग बाजे ॥ पायल छननन छननारे ॥ चाल ॥ तोम तनोम तोम तनदर तनदर ॥ तनोम तनोम तोम तनदर नारे ॥ चलत० ॥

लावणी.

कां भुलसी तूं यौवन धनाला ॥ जाईल ज्यानी होईल माती ॥ ॥ घृ० ॥ शोधुन पाहीं आपुल्या मनाला ॥ कां भूल० ॥

ठुंबरी.

बोल तूं उभी राहून । कांगें जाशि दूर लाजून ॥ धृ० ॥
एक वेळ तुझी मैत्री घडों दे ॥ उरीं गेला बाण लागून ॥बो०॥

ठुंबरी.

सख्याला आज पाहुन । चंचल मन जाहलें ॥ धृ० ॥ मुखीं विडा रंगला चंद्र शोभला ॥ आणा तयासी जाऊन ॥ सख्या० ॥ १ ॥

पद.

लागला मज छंद सख्याचा ॥ चल ह्मणसी तूं सदनाला ॥ ॥ धृ० ॥ महालीं मी एकली काय करावें ॥ लोभातें अंतर तरि पडला ॥ लागला० ॥ १ ॥

हारमोनियमचे सप्तसुर. ( चाल—मेरे गमका तराना० )

साग गम पप गम गम पध पम पभ गरीसा ॥ साग गम पप गम गम पध पम पम गरी सा ॥ सा सा नी ध ध नी प ॥ ध ध ध प म प ग ॥ पम मग रीगसा ॥ चाल ॥ गगप पपपपपप ध नी ध प प प प ध सा ध सा ॥ री सा नी ध ध ध प म प प प ध नी ध प प प ध ध सा ध सा ॥
धृ० ॥ १ ॥

हारमोनियमचे सप्तसुर. ( चाल—हंमदंगा लावुंनका. )

ग, ग ग ग, ग ग ग ग, ग ग ग ग ग म प प म, ग री सा ॥ सा प प प प प म म म ग ॥ धृ० ॥ चाल ॥ सा प प प प प म म म ग री सा ॥ सासा पपप ममम ग री सा ॥ सा प प प प प म म म ग री सा ॥ ग ग ग ग ग ग ग ग ग ग ग ग ग ग ग ग ॥ धृ० ॥

हारमोनियमचे सप्तसुर. ( चाल—या नरावरी भरवसातरी. )

ध ध ग ग ग ग म री री री री री ग म प म ग री सा ॥ सा नी ध ॥ री री सा सा नी ॥ ध ध नी री री री री री सा सा सा सा ॥ ध ध ध ध ध ध नी सा री सा सा नी ध॥धृ०॥

( पेटी. व सातारीचे सत सूर. चाल—आया बायानो जा. )

ध ध सासा सा री री ग ग ग ग री नी सा सा री ग री सा सा नी ध ॥ ध ध सा सा री री ग ग ग ग री नी सा सा री ग री सा सा नी ध ॥ ध ध सा सा सा री री ग ग री री नी सा सा री ग री सा सा नी ध ॥ ममम मम गरी री ग म प म ग री सा ॥ ध ध ध सा सा सा री ग री सा ॥ ध्रु० ॥

पद. ( चाल—तव मानस कैसें काय० )

जग पोषक ऐशी गाय ॥ वधिशी कशी यवना ॥ ध्रु० ॥ तव तनया पय दे माय ॥ करिशी तिस यातना ॥ पतित असुर अवनीवरी मारी ॥ बहु उपकारी धेनुही ॥ कृतघ्न झाला करि असि घाया ॥ शाप वरि अनि वार ॥ निष्ठुर करुनि मना ॥ जग पोषक० ॥ १ ॥

पद. राग खमाज— जिल्हा ( ताल त्रिवट. )

जय जय जय जोगेश्वरी त्रिपुर सुन्दरी ॥ अंब सांब सहित राहि हृदय मंदिरीं ॥ अंतरा ॥ अरुण वर्ण किरण जाल रंगीं रगली ॥ सावकाश धरि विकाश कधीं न भंगली ॥ अक्षयीं घे अक्षमाळजी करांगुली ॥ पुस्तकवर अभय हांसेत मिरवि चांगली ॥ १ ॥ फुल्ल लाल कमलांतरीं नित्य राहिली ॥ हृत् कमलीं योगिजनिं सुचित् वाहिली ॥ देवगणीं निज कामा-साठी दोहिली ॥ शिवशीला श्रीबाला आजि पाहिली ॥ २ ॥ अंबापुरीं रम्यस्थळीं माय इंदिरा ॥ पंच कनक कलशान्वित दिव्य मंदिरा ॥ माजि वसे कालत्रयीं वाद्य सादरा ॥ करिं करु-णा ओंवरित वामनादरा ॥ ३ ॥

धृपद. राग—खमाज ( ताल—मत्तताल. )

पतीत पावन सितारा‍ऽम राऽजाऽराम ॥ दीन दयाला मे घश्याम ॥ अं ॥ जाऽनकी नाऽथ दशरथनंदन रामा ॥ सुख सदन मदन मोहन दनुज दलन मुनी जन मन विश्राऽमा ॥

पद. राग—खमाज ( ताल त्रिवट. )

वरदे वरदे वरदेश्वरि माय दया करिं घेऽऽपदरीं ॥ अमरी—कबरी—भ्रमरी—मुखरी—कृतपादसरोजसुधालहरी ॥ अंतरा ॥ जगदंब विलंब नको करूं अपराध कदंबक लेकरूं ॥ रुससी तरि माय कसें करूं माय दया करि घे पदरीं ॥ १ ॥ पविपर्वत पंजर मेरु धरा, सुर शक्रहरा, महिषाग्रसुरा, गणिलें तृणतूल कसें समरीं माय दया करीं घे पदरीं ॥ २ ॥ मत्पाप पयोनिधी उग्रविषा शोषिल महेश न कोणतशा ॥ नान्यत्वदन्य महेश्वरी ॥ माय दया करिं घे पदरीं ॥ ३ ॥ अपराध सहस्र अनंत अशा गणना गणनाथ करील कशा ॥ थकला गोविंद सहेदरी माय दया करिं घे पदरीं ॥ ४ ॥

पद. ( चाल—प्रभो.

प्रिया करा क्षमा आतां या दीन प्रियेवरी ॥ राग नका धरूं किमपि हृदय मंदिरीं ॥ धृ० ॥ निष्ठुर वच आपणातें वदलें मी तरी ॥ त्यायोगें होत फार खेद अंतरीं ॥ १ ॥

ठुंबरी. ( राग—काफी. ग. पंजाबी. )

सखिरि मैं ठट पानिया कैसे ज्यावुंरी ॥ सखि नट नागर और मुगुट बारो करत ठटोली बनसी बट जमुना ॥ अंतरा ॥ कुचक बुचक ज्या देत अखतर ठट पण घट बनसी बह जमुना ॥ १ ॥

ठुंबरी. ( राग—परज.ग—पंजाबी. ]

क्या करूं न मानेरी सखेरी मोर मुकुट वाको धीट लंगर डगर चलत पानीया भरन ठलोली करता ॥ अंतरा ॥ सनंद पिया मोरे मानत नाहीं बार बार मुसे बलजोरी करत ॥

ठुंबरी. ( राग—परज—ता०—दीपचंदी. )

देऊं मी काय तुला ॥ माझ्या प्रियकर बाळा ॥ धृ० ॥ यज्ञोपवितची भूषण उरलें ॥ अन्य न तुज द्यायाला ॥ माझ्या० ॥

घे हें तर्पण करी तूं यानें ॥ तोषावें सुर पितरांला ॥ ॥ माझ्या० ॥ २ ॥

साकी.

खेद नको करूं किमपी हृदयीं प्राणसखेगे आतां ॥ येउनि बैसें मम संनिध तूं लाज मनीं नच धरितां ॥ सुंदरी मृगनयने ॥ ये ये झडकरी प्रेमानें ॥ १ ॥

पद. ( चाल—हारमिळे. )

नीच कर्म करुनि डाग उभय कुलिं जरी ॥ लाविलास हाचि खेद होत अंतरीं ॥ ध्रु० ॥ नऊ मास उदरीं त्वां राहुनि तरी ॥ कष्टविली ती साध्वि जननि सुंदरी ॥ जन्मतांचि मृत्यु तुला कां न सत्वरी ॥ आलासे मज गमतें समई या जरी ॥ १ ॥

ठुंबरी. ( राग—देस. ताल चौताल० )

अहो मारी वेग सुनलीजे अजी महाराज ॥ कबकी मैं उभी ठाढ़ी मैं दरवाजे अरज करे सामलो राज ॥ १ ॥

होरी. ( राग—छायानाट—ताल—धमार. )

अ-आज होरी खेले साम सहेली मिलगावत नाचत ब्रिज धूम मचाई ॥ अंकेसर कुम कुम भाल लगावत नाचत तामध तिलक मृगमदको बिराजत एकभर पिचकारी सुगंध लगावत झांझ झालर और डफ मिरदंगसो ॥ १ ॥

बंजारा.

अये परियो बताहो खुदारा, हये कहां गया बंजारा ॥ मैं दुंढनें उस्कु जोगन, बनके फिरती हूं बनबनजी कोयल साकरती पुकारा । हये कहां गया० ॥ १ ॥ जंगल जंगल मैं भटकूं ॥ या पहाडपर सर पटकूंजी ॥ सेहरोमें फिरी आवारा ॥ हये कहा गया० ॥ २ ॥ कभी मोमसी मैं गलती हूं ॥ कभी शम आसीफ़त जलतीहूंजी ॥ कभी चश्म बनी फवारा । हये कहांगया०

॥ ३ ॥ गुलफामकी देखो सुंदाई । जोगन हये परिकूं बनाई जी ॥ इये इश्के झरिफन आश ॥ हये कहां गया० ॥ ४ ॥

पद. ( चाल-अंगिकार करुनि. )

कोण नष्ट दुष्ट शब्द लावि राजया ॥ कंठ स्नान घालुं काय याच स्थानिया ॥ छेदुं जीभ जी वदे किं पापि वाणिला ॥ खंड खंड कीं करोनि दंडुं याजला ॥

पद. ( चाल-पृथ्वीनाथ गर्वोक्तिचे. )

बाणांचा भडिमार करूनिया, खिळुनी टाकिन सर्व विरांना ॥ पृथ्वी जिंकूं या गर्वाच्या, समुळचि खंडिन आतां वचना ॥ राज्यवैभवें अंधचि झाले, शासिन समरीं त्या मत्तांना ॥ छेदिन जिव्हा शस्त्रास्त्रें मी, भ्याडचि आम्हां मानिती त्यांना ॥

पद. ( चाल-वद जाऊं कुणाला शरण. )

बघ कवण निचे आजला, नेत्र फोडिला आगईचा ॥ तो अदय जगीं साचा ॥ वनदेवींग ॥ तो अदय० ॥ मम कल्पवृक्ष तो भला, कोणि तोडिला, निर्दयानें ॥ भूपतिस कसें मानें ॥ वनदेवींग ॥ भूपतिस० ॥ मज्ज नयनहीना पासुनी ॥ काठि चोरुनि ॥ कोणि नेली ॥ दीन इज्जसि कीं केली ॥ वनदेवींग ॥ दीन०॥ ह्या कृपणाच्या नवधना, हरुनियां मना, दूखविले ॥ हें हृदय सखे पोळे ॥ वनदेवींग ॥ हे हृदय० ॥

पद. ( चाल-वद जाऊं कुणाला शरण. )

कशि सोडुनियां काननीं, दीन हे हरिणी, व्याघ्रसदनीं ॥ जातसां योग्य का करणी ॥ सदयारे ॥ मा जाऊं कुठें या वनीं, घोर हे ध्वनी, भीववीती ॥ होईल कायहो गती ॥ सदयारे ॥ कर्दमीं जसें प्रस्तरा, तसें देवरा, बुडवितां व्यसनीं ॥ कां दया नये तव सुमनीं ॥ सदयारे ॥ बहु काकुळती येउनी, कंठ शोषुनी मारि हाका ॥ त्या तुह्मी कां नहो ऐका ॥ सदयारे ॥

ठुंबरी.

अब तो रहो नाहीं जाय ॥ संय्या मारारे, अब तो रहो० ॥ ॥ धृ० ॥ चार पहर मिले गालियालें आईरे बावरी धरो मेरा नाम सांवरी धरो मेरा नाम ॥ अब तो रहो ॥

ठुंबरी.

साजणा करूं तरि गत कैसी ॥ धृ० ॥ मदन मनोहर इच्छि-तसे तुज ॥ ठेवुनि कृपेनें शांत करीं मन ॥ साज० ॥

पद.

लागला मज छंद सख्याचा ॥ चल झणसी तूं सदनाला ॥ ॥ धृ० ॥ महालीं मी एकली काय करावें ॥ लोभातें अंतर तरि पडला ॥ लाग० ॥

होरी. ( राग-देस. ताल-धमार. )

कैसी होरी खेलत किसन कनैयां ॥ अब कैसी जाऊं मेऊन सौंग दैयां ॥ धृ० ॥ भरभर पीचकारी रौंग मचाऽऽवत बैयां पकर बरजोरी करत ॥ १ ॥

सबजपरीकूं सवाल.

लाया सेहेजादेकूं मैं जाकर हिंदुस्थान, तूं अपने मा आ शुक-को सब्जपरी पंहेचान ॥

[ कालादेवकूं जबाब. ]

यही है शेहजादा यही है मेरी जान, यही मेरा दिलदार है मैं इस पर कुरबान.

गज्जल.

घरसें यहां कोन खुदाके लिये लाया मुझकों, किस्सी तम गा-रने सोतेसे जगाया मुझकों, हकने क्या ख्वाब परेशा येह दिखाया मुझकों, नजर आता है न अपना न पराया मुझकों, बसमें जालिमके लिये मुझे छोड दिया है गजब, ढुंढ़न कोई परस्तानमें न आया मुझकों. है फसद है किसीने नखबरली मेरी, क्या अजीजोनें मेरे दिलसे भुलाया मुझकों, नींदसे

आखी किसीकी न खुली कोठेपर; ऊठके मुझके न चुंगलसे छुडाया मुझकों, तादमें मुर्ग अब उमेद रहा कीन हीं, किसबला में मेरे अल्लाह फसाया मुझकों, मुरलसी की कोई तदबीर बता- दो उस्ताद है बहोत गरदीश किस्मतने सताया मुझकों.

हुंबरी. ( धनाश्री. )

सुंदर सुराजनवा साईरे ॥ साईरे मम भाईरे ॥ सुंदर० ॥ धृ० ॥
तुम बिन मैं तो कलन परंतु है आन मिले रव साईरे॥सुंदर०॥

( सबजपरी आणि शहाजादेचा सवाल जबाब. )

देखो तुम मेरी तरफ घरका मतलो नाम ॥ लंउडी मुझको जानकर करो यहां आराम ॥ जो होना था सो हुआ जाना दो बस खैर ॥ चलो फिरो खाओ पिओ करो बागकी सैर ॥ बतलाओ अब तुम हस्व नस्व और तुम ॥ अपना ना रहते हो किस काममें होंगा कहा मुकाम ॥ खिलवतमें रहेता हूं ऐस है मेरा काम ॥ शाहाजादा हूं हिंदका नाम मेरा गुल्फाम ॥

तूं औरत किस कामकी, अपना नाम बता ॥
दोना शानो परतेरे, निकला है येह क्या ॥
कोमकी होंगी मैं परी, समझन तूं हैवान ॥
येह दोन पर है मेरे, अये मुरख नादान ॥
रहती हूं मैं काफमें, सबजपरी है नाम ॥
राजा इंदरके यहां, नाच मेरा है काम ॥
जलदी येह बतला मुझे, दिलको है विसबास ॥
मेरा आन किस तरेह, हुवा मैं तेरे पास ॥
तुजपर मैं आशक हुई, चलते चलते राह ॥
उठा मंगायो यहां तुजे, भेजके देवसि पाह ॥
सिरपें आखों पें कली, जेपे बिठाऊं तुजकों ॥
ओ मेरे पास गलेसे, मैं लगाऊ तुजकों ॥
दिला जासे मुझे भाती, है अदाये तेरी ॥
पासला चांद सामहलू मैं बलाये तेरी ॥

लेट पहलू में मेरे घरको मैं आबाद करूं ॥
तुजकूं लिपढाके गेले, वस्लसेद्रि शादकरूं ॥
वस्लकी तेरी कसम, घरमें है खाना मुझकों ॥
नख बरदार–अभी, हाथ लगाना मुझकों ॥
मुझको नादान समज दूर हो दानाहू मैं ॥
कौमकी तूं जो परी है, तो सियाना हूं मैं ॥
बसवा तुजसी जमानेमें, न होगी जिनहारा ॥
आप बदना नाम हुई, मुजसें छुडाया घरबार ॥
भेजकर देव मुझे, खेचे बुलाया तूनें ॥
आदमी जादकों, कंदेमें फसाया तूने ॥

लावणी. ( राग–देस. ता–त्रिवट. )

प्राण प्रिया ऐका साजणा हो ॥ फाकडी नार सजुन नटुन उभी होती बागेमध्यें मैना ॥ प्रा० ॥ धृ० ॥ देखिलें तेथें विचित्र तरुलता फुलें तोडी मृगनयना ॥ वाकुडी भृकुटी दृष्टी शरें मज आचुक मारी उरीं नैना ॥ प्रा० ॥ १ ॥ रंभा रूप जलनीजल परी तूं मदन मोहना ॥ तुझा सारिखा मित्र दिसेना भोग भोगी सुखशयना ॥ २ ॥

ठुंबरी. ( राग–केदार नाट–ताल त्रिताल )

अ-गोरी हटजी नकरीये पीहारवा मोरे गरवा हसहस बतिया करिये ॥ अं ॥ जो कोई आवे अपने मंदरवा उनसे गर्व न कीजीये ॥ मेहेरबान उनसे लगा लाई डोरिया ॥ १ ॥

ठुंबरी. ( राग–पिलू. )

मोरारे बेरागी जोगीयां ॥ तोरे बिना सैयाके कारनवा ॥ ॥ मोरारे० ॥ धृ० ॥ कानोंमें कुंडल गले मृगछाला घर घर अलक जगावे मोरारे० ॥ १ ॥

ठुंबरी.

मधशे भरी हटजाय ॥ हेरी गुजरिया मधशे भरी हटजाय ॥

॥ धृ० ॥ सोधा होय तो करके मुसाफररे चार दिनके गुजरिया ॥ मधशे भरी० ॥ १ ॥

ख्याल.

माखन चोरारे जियरा ले गयो ॥ धृ० ॥ हूं जाती थी बिंद्राबनको । बयां पकर कक झोरारे ॥ नागर नागर बाबर बोलो । बोले नंदकिशोरा ॥ मा० ॥ १ ॥

पद. ( चाल–रडे हा गोविंद राधे तुझ्या गृहीं नेई. )

पदरीं धरूनी हरि आणागे ॥ बाई पदरीं० ॥ धृ०॥ शिरीं बांधियेला चिरा ॥ खोवी मोतीयाचा तुरा ॥ बरा झळकतो हिरा॥ अमोलिक दाणागे ॥ प० ॥ १ ॥ येऊनियां यमुने स्थळीं ॥ खेळतसे चेंडूफळी ॥ तोचि तो हरि वनमाळी ॥ चतुरही शहाणागे ॥ २ ॥ मत्स्य कूर्म नानापरी ॥ दशविध रूपे धरी ॥ अमृताचा साहाकारी ॥ सांगतसे खुण हे ॥ प० ॥ ३॥

( पाळणा. सुतार निरगुणिचा. )

सुतार निरगुणीचे तुजसाठीं आणवीले ॥ पाळणे रंगित बनवीले ॥ चहुंबाजूंनीं चिमण्या मोर बसवीले ॥ निजनिज बाळा झोंके देतां हात दुखला ॥ गाणीं गातां कंठ हा सुकला ॥ जाई जुई चमेलि पुष्पांनीं पाळणा गुंफीला ॥ न जाणो खडा बाळाला रुतला ॥ १ ॥ केव्हांचि मी हालवीतें सुचेना काम धाम धंदा ॥ निज निज बाळा गोविंदा ॥ काय सांगु सखे हरी मोठा बाजिंदा ॥ काय मनमोहन मुकुंदा ॥ काय सांगु सखे बाळ झालें माशें यंदा ॥ घेती आया बाया ह्या तिंदा ॥ घ्या बायानों हरी पाळण्यांत सुतला ॥ न जाणो खडा बाळाला रुतला ॥ २ ॥ कोण्या पापिणिची दृष्ट झालीग बाई ॥ बाळ अगदिंच दूध पित नाहीं ॥ काय सांगु सखे उपाय करूं तरी काई ॥ नेत्र झांकिले उघडित नाहीं ॥ जिव दिलगीर हा झाला बाळाचे पायीं ॥ कुठें चित्त मन लागत नाहीं ॥ कोण्या पापिणिनें भरला बोलहा रुतला ॥ न जाणो खडा

बाळाला रुतला ॥ ३ ॥ रूप बाळाचें काय सांगूं तुज पाशीं ॥ जसे भानु आले उदयासीं ॥ अहारे भगवंता कसें घडलें अशा पुतळ्याशीं ॥ तुझी कळा नकळे कोणाशीं ॥ जीव ध्यातो हा सदा रहावे तुजपाशीं ॥ चला वेगें वैकुंठासीं ॥ ह्मणे क्षणभर हा हरी सेवेमध्यें गुंतला ॥ न जाणो खडा बाळाला रुतला ॥ ४ ॥

समाप्त.

---


## प्रियवाचकहो !

मेहेरबानी करून खालील चार लाइनीकडे लक्ष्य द्याल काय?

रा. रा. बाळकृष्ण उर्फ कुशाबा लक्ष्मण नेटीव डॉक्टर हे चालू रोगावर व इतर अवांतर रोगांवर रामबाण औषधाची योजना करितात, ह्या बद्दल आमची पूर्णपणें खात्री झाली आहे, तरी आमचे देशबांधव व देशभगिनी इतर रसायणें वगैरेचे दवे न खातां आमच्या वरील नांवाच्या गरीब डॉक्टरा कडून अपायाला योग्य उपाय करून घेतील अशी मी पुस्तक प्रसिद्ध कर्ता परमेश्वराजवळ इच्छा करित आहे. आमच्या समक्ष प्लेग, ताप, गरमी, पक्षवायू, नाळगुद, लेव्हर, वेडा, मधुरा, विषमज्वर, दमाखोकला इत्यादि त्यांच्याकडे आलेल्या रोग्यास परमेश्वराच्या सत्तेनें गुणांवांचून परत पाठविलेच नाहीं व ह्यांच्याजवळ शें, दोनशें सर्टिफिकीटेंही आहेत. अनुभव घ्यायचा असेल त्यांनीं खालील पत्यावर येऊन भेटावें.

पत्ता

बी. एल. साळवी. कासारगल्ली मुंबई.

आह्मीं छापलेलीं सर्व तऱ्हेचीं पुस्तकें विकत मिणळ्याचीं ठिकाणें.

सदाशिव गणपतशेट धामणसकर.

पानसुपारी व पुस्तक विक्रीचें दुकान कासारगल्ली, मुंबई.

बाळकृष्ण लक्ष्मण पाठक विठ्ठलवाडी मुंबई.

जनार्दन महादेव गुर्जर रामवाडी मुंबई.

[ नारायण रामचन्द्र सोहनी जगदीश्वर छापखान्याचे मालक कांदेवाडी मुंबई. ]

वासुदेव मोरेश्वर पोतदार कांदेवाडी मुंबई.

विनायक दादोबा पुरंदरे आणि कंपनी माधवबाग मुंबई.

गोपाळ नारायण आणि कंपनी काळकादेवी मुंबई.

अनंत केशव जोशी आणि कंपनी काळकादेवी मुंबई.

आणि

[ जि. रत्नागीरी ता. संगमेश्वर मौजे कलबुशी येथें लक्ष्मण जोर्तीशेट खातु यांच्या कडे. ]

[ जि. पुणें ता. खेड मौजे कुर्द अवसरी येथें विठ्ठल रावजी शेट शेवाळे यांच्या कडे. ]

व खालीं सही करणाराकडे विकत मिळतील.

टी. जी. धामणस्कर.

बुकसेलर्स पब्लिशर्स आणि कमिशन एजंट्स, माधवबाग-मुंबई.